मनोहर-ग्रंथमाला प्रकाशन ३७ वें

# हंसरा-निर्माल्य

आणि

# चिमण्या



लेखिका :
डॉ. कमलाबाई देशपांडे

१९५५






किंमत २ रुपये

# अनुक्रमणिका

## हंसरा-निर्माल्य





## चिमण्या

# शुद्धिपत्र

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १९ | ४ | तिस्या | तिच्या |
| ३३ | १८ | माघं' | माघं |
| ४४ | ८ | वरकाम करणारी, स्वयंपाक करणारी मैनाबाई व पारूबाई | वरकाम करणारी पारूबाई व स्वयंपाक करणारी मैनाबाई |
| ५१ | ३० | भ्रम | ब्रह्म |
| ५६ | २० | खडाखंगी | खडाजंगी |
| ५८ | ३ | चपला | चंचला |
| ५८ | २८ | कळल्या | कळत |
| ९६ | १८ | कपनी | कफनी |
| ९९ | ९ | when fond | When fond |
| ९९ | १० | this bleak | This bleak |
| ९९ | १२ | काय करणार | करणार काय |
| १०९ | ७ | अथवा 'मृदुनैव | 'अथवा मृदुनैव |

पितामही

श्री. यशोदाबाई केळकर

यांस—

म्हणजेच

कै. ती. आईस

सादर समर्पण.

# प्रस्तावना



काय म्हणतात ना! "माणसानें दिलेलें पुरत नाहीं व देवानें दिलेलें सरत नाहीं." सुखाचेंहि असेंच. माणसाच्या मनांत सुखाचें बीज बाहेरून आणून रुजत नाहीं व मनांत फुललेलें सुकत नाहीं. आमची आई नेहमीं म्हणे, "बाई ग! जगांत सुख कधीं मागून मिळत नाहीं; तें ज्याचें त्यानें लावून घ्यावें लागतें." त्या दृष्टीनें सभोंवार पाहत असतां जीं कांहीं व्यक्ति-वशिष्ट्यें डोळ्यांत भरलीं त्यांचें चित्रण करण्याचा हा प्रयत्न आहे.

एअरोड्रोम, अहमदाबाद.
१ डिसेंबर १९४४

कमलाबाई देशपांडे

# लाडु आत्याबाई : : : १

आमच्या लाडु आत्याबाई. त्यांचें लाडुबाई हें नांव व त्या स्वतः दोहींची आम्हां सर्वांना मोठी करमणूक.

" हं म्हणा पाहूं तोंडपाठ आज पाठ केलेंत तें " स्वयंपाकघरांत जेवतांना अण्णा म्हणत होता.

उमाळ्यावरी येतसे सूर्य जेव्हां । नभीं होतसे चंद्र निस्तेज तेव्हां ॥
तुझें चंद्रराया सरे राज्य आतां । प्रतापी महाराज हा सूर्य येतां ॥

" उमाळ्यावरी म्हणजे उंचवट्यावर; नभीं म्हणजे आकाशांत; निस्तेज म्हणजे तेजरहित." आत्याबाई अण्णाजवळ बसून म्हणून दाखवीत होत्या.

शब्दार्थ म्हणून झाला. पुढें अन्वय व पुढें अर्थही त्यांनीं म्हणून दाखविला.

" ठीक ! ठीक ! उद्यां आणखी दोन पानं पाठ करून म्हणून दाखवा. एक चूक निघतां उपयोगी नाहीं."

" पण आज छान पाठ झालं होतं ना ! "

इतका वेळ मी मुकाट्यानें ऐकत होतें. आतां मात्र माझ्यानें राहवेना. मीं म्हटलें अण्णाला, " ही का तुझी शिकवावयाची रीत. आधीं शब्दार्थदीपिका पाठ करून घेऊन मग धडे वाचून घेणार वाटतं."

" मग त्याला काय हरकत आहे ! अण्णा म्हणाला, " त्यांना काय दुसरा उद्योग आहे. करीनात का दिवसभर पाठ."

" सांगूं दे ग मला तो." आत्याबाईनीं त्याचीच बाजू घेतली, " तो सांगतो तें मला सगळं समजतं."

" मग ठीक आहे. तो सांगतो व तुम्हांला समजतं मग मी कशाला बोलूं उगीच." मीं म्हटलें.

आत्याबाईनीं त्याची बाजू घेतली तेव्हां अण्णाला जास्तच जोर आला माझ्याविरुद्ध मतप्रतिपादनाला. " असंच शिकायचं हं आत्याबाई, पूर्वी आपल्या ऋषींना सर्व विद्या मुखोद्गत असत. असलीं छापण्याचीं यंत्रं नव्हतींच तेव्हां. पार पार स्मरणशक्ति गेली या छापील पुस्तकांनीं. मी सांगेन तितकं पाठ कराल ना ? "

" तें तर आतां ठरलंच रे ! तूं शिकवशील तितकं शिकणार."

" खूप शिका. मराठी झाल्यावर आणखी इंग्रजी शिकवणार आहे तुम्हांला."

" म्हणजे आर्धी डिक्शनरी पाठ करून घेऊन मग प्रायमरला सुरवात!" मीं भर घातली.

आणि हा प्रकार नेहमींचाच होता. आत्याबाईंना मुलांची करमणूक व मुलांना आत्याबाईंची करमणूक. नेहमीं घरांत लहान मुलें असलीं म्हणजे मोठ्या माणसांना करमणूक होते म्हणतात. पण आमच्या घरीं आत्याबाई म्हणजे मुलांची मोठी करमणूक होती. त्यांनीं आनंदी कां असावें याला कांहींच कारण नव्हतें. जन्मापासून प्रकृतीनें दुबळी व वृत्तीनें बावळी अशी खुरटलेली वेल होती ती. लहाणपणीं अशक्त व आजारी म्हणून आईनें दूर केली नाहीं. जरा मोठी होऊन चार बरोबरीच्या मुलींचें पाहून चलाखपणा यावा तों पायाला कुरुपें होऊन अधूपणा आला. त्यामुळें बाहेरच्या जगांत मिसळणें कमी झालें. त्यांत लग्नानंतर पाठोपाठ वैधव्य आल्यानें सामाजिक अधुपणा आला. फार जुना काळ होता तो. मुलीला शिकवा असें कुणीं सुचविलें तर आईबापांना कमीपणा वाटे. आईनें तर एकदा रागावून सांगितलें, कीं माझी मुलगी कुणाला जास्त झाली असली तर भिक्षा मागेल, पण तिला शाळेंत पाठवून शिकविणें माझ्यानें होणार नाहीं. हातपाय तरी धडधाकट असावें या हेतूनें पायाचीं कुरुपें कापवून काढलीं पण त्यानें पाय सुधारण्याऐवजीं पावलें जास्तच दुर्बळ झालीं व नेहमींच चवड्यांवर चालण्याचा प्रसंग आला. कालप्रवाह चाललाच होता. आईबाप कालवश झाले व दूरच्या नातेवाइकांकडे राहून दिवस काढण्याचा प्रसंग आला. आतां या परिस्थितींत आनंदी स्वभाव राहावा कसा? अशी कोणती गोष्ट आयुष्यांत घडली होती, कीं ज्यामुळें समाधान वाटावें अगर जीवनाचा आनंद वाटावा! उरलेला जन्म झुरत व रडत काढत्या व स्वतः दुःखी होऊन भोंवतालीं उदास वातावरण निर्माण करत्या, तर कांहीं त्यांना कोणीं दोष दिला नसता. पण तसें न करतां आपणच इतरांच्या आनंदांत समरस होण्याचा प्रयत्न त्या करीत हेंच त्यांचें वैशिष्टय. पुष्कळदा पाहणाराला वाटे यांची संवेदनशक्ति अगदीं बेताची दिसते, कीं त्यांना स्वतःची परिस्थितीच कळत नाहीं? त्यांचा आनंद हा अज्ञानांतून निघालेला आहे. पण ज्या गोष्टीची प्राप्ति कधींच व्हावयाची नाहीं, फक्त दुःख वाढावयाचें, तें ज्ञान होऊन तरी काय फायदा?

घरामध्यें जड जबाबदारीचीं कामें करणें प्रकृतीमुळें शक्य नव्हतें. पण आटोक्यांतील किरकोळ कामें त्या बिनचूक करीत. लहान मुलांचीं कामें त्या

विशेष आनंदानें करीत आणि त्यामुळें मुलांना सर्वांना आत्याबाई हव्या असत. मुलांना वेळच्या वेळीं खावयास देणें, त्यांच्या कपड्यांच्या घड्या घालणें, झोपवितांना सोबत बसून गोष्टी सांगणें त्यांना होई. किरकोळ केरवारे, पाटपाणें घेणें इत्यादि त्या करीत. वेळप्रसंगीं स्वयंपाक करून जेवावयासही घालीत, पण मग लागलीच दोन दिवस अंथरूण घालीत. पण बाकीचा रिकामा वेळ जावा कसा? घरांतील इतर सर्वांचें वाचन पाहून मग त्यांना लिहितां वाचतां यावें असें वाटूं लागलें.

"अण्णा-विठ्ठल! तुम्ही शिकवाल कारे मला लिहायला व वाचायला?" संध्याकाळीं मुलांना त्यांनीं प्रश्न केला.

"हो! हो! पण रोज कांद्याची कोशिंबीर करून वाढली पाहिजे."

"येवढेंच ना! रोज दोन कांदे चिरून घालीन." आत्याबाई हाताचीं दोन बोटें नाचवीत म्हणाल्या.

"मग म्हणाल माझे पाय दुखले." विठ्ठल.

"कांदे चिरून काय पाय दुखतात, बोलला कांहीं तरी दिवा!"

"पण मी सांगेन तितकें रोज पाठ केलें पाहिजे." अण्णा म्हणाला. आत्याबाई वाढायला असल्या तर मुलांना जास्त जोर येई. वेगवेगळे जिन्नस एकदम मागून ते त्यांना धावायला लावत. त्याही पण खंबीर! त्यांना पुरून उरत. मंडळी मुद्दाम गडबड करतात असें लक्षांत येतांच आमटीच्या पातेल्या-सकट पानापुढें बसून राहत व बजावीत "सरळ ओळीनें एक एक जिन्नस मागाल तर वाढतें. नाहीं तर ही जातें व खोलींत जाऊन अंथरूण पसरून निजतें. मग येतील वहिनी व पाहतील. अरे मी दुबळी; वहिनीला मदत म्हणून काम करतें. उद्यां तुमच्या बायका आल्या कीं जेवायखेरीज स्वयंपाक-घरांत पाऊल घालणार नाहीं."

"आमच्या बायका नाहीं तुमच्या हाताखालीं काम करणार."

"नाहीं म्हणजे? रीतच असते सुनांनीं सासूच्या हाताखालीं काम करण्याची. मी त्यांना काम सांगणार."

"अहो पण हा प्रश्न बायका येतील तेव्हांचा." विठ्ठल म्हणे "आतां आधीं भात वाढा ना!"

"वाढणार नाहीं." आत्याबाई जोरानें म्हणत. "आधीं कबूल करा त्या

माझ्या हाताखालीं काम करतील म्हणून. मी त्यांची कशी असलें तरी सासू होणार."

"आतां शिकरण करून घातलीत तर सांगूं त्यांना काम करायला."

"हो करीन रे! तूं सांगून तर पहा."

—आणि शिकरणीवर मग समेट होई.

अशा रीतीनें त्यांच्या शिक्षणाला सुरुवात झाली. लहानपणीं शाळेंत शिकलेल्या बाराखड्यांची उजळणी झाल्यावर त्यांनीं पहिलें पुस्तक वाचलें व आतां दुसरीचें वाचूं लागल्या होत्या. अण्णा आपल्या विचित्रपणानें त्यांना हवें तितकें तोंडपाठ करावयास लावी व त्याही न कंटाळतां करीत. पुढें कोणतेंही पुस्तक त्या वाचूं लागल्या पण लेखनांत प्रगति फारशी झाली नाहीं, एक पत्र लिहायला त्यांना दोन दिवस लागत.

वाचनाचा नाद त्यांना फार लागला. महाभारताच्या मराठी भाषांतराचे सभापर्व, वनपर्व सर्व त्यांचें वाचून झालें. दुपारीं जेवतांना रोज त्या वहिनींना भारतांतील एक गोष्ट सांगत. कठीण शब्द आला तर विचारीत व त्याच्या पुढची पायरी म्हणजे त्याची चर्चा करीत. 'पण धर्मराजानें कांहीं झालें तरी बायको पणाला कशी लावली? हें चुकलें नाहीं का वहिनी? अशा तऱ्हेनें आपले विचार व्यक्त करीत. अलीकडे वर्तमानपत्रें वाचावयाचाही त्यांना नाद लागला होता, रोजचा ज्ञानप्रकाश, संदेश व केसरी त्या वाचीत; व त्यांतील न समजणाऱ्या गोष्टी विचारून घेत.

"काय रे अण्णा!" त्या विचारीत, "हें वर्तमानपत्रांत सारखं जहाल व मवाळ येत असतं तें काय रे?"

"जहाल म्हणजे भांडखोर, कुणाला न भिणारे व तिखट मिरच्या खाणारे लोक आणि मवाळ म्हणजे बावळट, सरकारला भिणारे व दूधभात, भेंड्यांची भाजी खाणारे." अण्णा सांगत असे.

"अरे असें काय कांहीं तरी शिकवतोस?" मी म्हणे, "माहिती देतांना सरळ द्यावी."

"ते कीं नाहीं आत्याबाई दोन पक्ष आहेत. त्यांचीं नावें राष्ट्रीय पक्ष व नेमस्त पक्ष. सरकारला धक्के दिल्याखेरीज कांहीं मिळायचं नाहीं असं एकाला वाटतं व दुसऱ्याला वाटतं सरकार समंजस आहे, त्याला नीट तऱ्हेनें

विनंति केली तर ते राज्य देतील. हे भांडूं लागले म्हणजे एकमेकांना जहाल व मवाळ म्हणून नांवे ठेवतात इतकेंच." मीं सांगितलें.

"तुम्ही तिचें ऐकूं नका. ती मवाळांची पक्षपाती आहे," अण्णा त्यांना सांगत होता.

"मी सांगतों त्या कविता तोंडपाठ करून ठेवा. मवाळांच्या अर्जांनीं व विनंत्यांनीं काय व्हायचें आहे."

"रडलें स्वराज्य त्यांचें
अर्जेही कचऱ्यांत जाऊनी पडले।
त्याच्यामुळेंच लवही
देशाचें कार्य हो नसे घडलें॥"

आणि जहाल काय म्हणतात?

"झगडुनि भांडुनि शौर्यें
सर्व जगाला करोनियां थक्क।
आम्ही जहाल म्हणुनी
हिसकुनि घेणार आमचे हक्क"

"पण मी म्हणतें हे मोठमोठे लोक असे भांडतात का?. ते काय अण्णाविठ्ठल आहेत?"

"बरं मी त्यांना जाऊन सांगतों कीं आमच्या आत्याबाईचें मत आहे कीं तुम्हीं भांडूं नये."

अण्णाचें पहिलें कवितांचें पुस्तक प्रसिद्ध झालें तेव्हां त्यांना मोठें कौतुक वाटलें.

"कायरे अण्णा" हातांत पुस्तक घेऊन त्या म्हणाल्या "तूं तर आतां मोठा लेखककार झालास, आतां वक्ताकार कधी होणार?"

"आत्याबाई आतां वक्ताकार तुम्हीच व्हा." अण्णा.

"नाहीं तरी तुम्ही स्वयंपाकघरांत. बसून बडबडतांच तेंच उभं राहून बोलायचं." विठ्ठल.

"हो बोलेन. आहे काय त्यांत! जें आपल्याला वाटतं तें नीट मोठ्यानं सांगायचं. अरे, मला चालतां येत नसलं म्हणजे बोलतांसुद्धां का येणार नाहीं?"

"हो हो! आपण वसंत व्याख्यानमालेंत तुमचं एक व्याख्यान करवूं. 'टिळक व गोखले यांना आत्याबाईचा उपदेश'."

रात्रीं वहिनी जेवावयास बसल्या म्हणजे मुलें व आत्याबाईभोंवतीं गोष्टी

सांगण्यास जमत व तेव्हां आत्याबाईंच्या वक्तृत्वास जोर येई. एकदा त्या हिंगण्याची शाळा पाहून आल्या व आल्यावर त्यांचें समग्र वर्णन त्यांनीं सांगितलें.

"हें पाहा वहिनी! मी ही अशी दुबळी. त्यामुळें कधीं कोठें कांहीं पाहायला जायचं म्हणत नाहीं. पण या वेळेला ठरवलं. आपली अक्काच जर हिंगण्याला आहे आणि तीसुद्धां नुसती अशी तशी शिकणारी मुलगी नव्हे कांहीं!—तर अहो, तिथली अगदीं मुख्य म्हणजे सुपरिंटेन्डेन्ट्. तर आतां काय हरकत आहे जायला. मीं मुळीं तिला सांगितलंच, कीं मी थोडी थोडी शाळा तीन दिवस पाहणार. अरे अण्णा, तिथं कांहीं अशा घरच्यासारख्या हाका नाहीं मारायच्या 'जेवायला चला जेवायला चला.' एक मुलगी येते कीं घंटा देते. चालल्या मुली एकामागून एक जेवायला. सकाळपासून सारख्या घंटा. ही काय उठायची घंटा. पुढें लागलीच आंघोळीची घंटा. मग चहाची घंटा. मी म्हणतें, पण कोणती घंटा कशाची हें बरोबर कळतं कसं साऱ्यांना! खोलींत गेलें तों ट्रंकान् वळकटया, ट्रंकान् वळकटया, असं वाटलं स्टेशनावर आगगाडीची वाट पाहत बसल्या आहेत या मुली. घंटा झाली कीं चालल्या ओळीनें शंभरदीडशें मुली. पण सगळं कसं यंत्रासारखं चालतं! नाहीं तर तुम्हीं. चार मुलं घरांत पण घर जसं डोक्यावर घेतां."

"त्यांचं गॅदरिंग का काय तें होतं रे त्या दिवशीं. काय मुलींनीं पोशाख केले होते? असा राजाचा व राणीचा पोशाख होता कीं वाटलं, खरंच का कुठल्या संस्थानचे राजे यांनीं बोलावून आणून बसवले आहेत. आणि हें नाटक झाल्यावर मग तुमचे कर्वे बोलायला उठले. साठ वर्षे झालीं म्हणतात. म्हातारा पण काय आवेश. अरे जसा एकादा योद्धा समरांगणावर उठून उभा राहावा त्याप्रमाणें उभे राहून जोरानें ओरडून ओरडून सांगत होते कीं, "मुलींनो, शिक्षण शिका. शिक्षण शिका."

सर्व मुलांनीं टाळ्या वाजवून सांगितलें, "शाबास वक्ताकार! आतां मात्र वसंत-व्याख्यानमालेंत तुमचें व्याख्यान करावयास कांहींच हरकत नाहीं."

"अरे जा! मीं कांहीं भितें कीं काय? काल कर्व्यांनीं सांगितलंच कीं इच्छा असली म्हणजे माणसाला सगळं करतां येतं."

* * *

मुलांच्या लग्नानिमित्त पाहुणेमंडळी जमूं लागली होती. रात्रीं वहिनी व

इतर बायका जेवावयास बसल्या होत्या. तेव्हां आत्याबाईनीं अण्णा, विठ्ठलांना बोलाविलें व शेवटचा धडा दिला.

हे पाहा वहिनी तुमच्यासमक्ष मी यांना सांगतें. "अण्णा, विठ्ठल, तुम्ही आतां मोठे होणार. उद्यां लोकाच्या मुली घरांत येणार. तेव्हां पोरकटपणा करावयाचा नाहीं. मला 'लाडु लाडु' म्हणायचं नाहीं. नुसतं आत्याबाई म्हणायचं. नाहीं तर सुनासुद्धां 'लाडु सासुबाई' म्हणतील. व्यवस्थितपणें वागायचं, येतां जातां वहिनींना खायला मागायचं नाहीं—

"मग काय बायकोला मागायचं?" विठ्ठल.

"तसं नव्हे रे. येतां जातां खायचंच नाहीं. माझी चेष्टा करायची नाहीं. तुम्हांला वाटतं आत्याबाई म्हणजे एक बरोबरीची खेळगडी आहे. पण तशी चेष्टा करावयाची नाहीं. मी तुमच्या बायकांना काम सांगणार. त्यांना असं वाटूं नये कीं आहे एक वेडगळ बाई घरांत. अरे, मी आतां त्यांची आतेसासू होणार. नुसती तुमची आत्याबाई नव्हे."

---

## भीमकाका : : : २

आहेत त्या घरांतल्या आत्याबाई, पण म्हणतात त्यांना काका. आणि त्यांची धिप्पाड, कणखर व पुरुषी बांध्याची शरीरयष्टी पाहिली म्हणजे काका म्हणणाऱ्या मंडळींचा तो विनोदातिरेक न वाटतां समर्पकता वाटते. ब्रह्मदेवानें प्रकृतिस्वास्थ्याखेरीज संतति, संपत्ति, भाग्य इत्यादि गोष्टींची वाटणी केली त्या वेळेला त्या गैरहजर होत्या म्हणून असो, कीं इतर कांहींच द्यावयाचें नाहीं तर निदान आरोग्य तरी भरपूर द्यावें असें ब्रह्मदेवास वाटलें म्हणून असो, शरीरसंपत्ति त्यांना भरपूर होती. ऐंशी वर्षे उलटून गेलेली पण कणखरपणा पन्नाशीच्या उमरीलाही लाजवील असा. पंचवीस पानांचा स्वयंपाक करूनही संध्याकाळीं देवदर्शनाच्या निमित्तानें मैल दोन मैल सहज फेरफटका करतील. नव्हे, त्याखेरीज त्यांना चैनच पडणार नाहीं. दात खंबीर, चावण्याची तक्रार नाहीं, कीं डोळे चांगले तेव्हां दिसण्याची तक्रार नाहीं. त्यामुळें कोणतीही गोष्ट तरुणाच्या उत्साहानें करावयास त्या तयार असत.

पण प्रकृतीखेरीज इतर सर्व मागण्यांकडे देवानें फारच डोळेझाक केली होती. मला आठवतें तसें आज चाळीस वर्षं त्या कोणा ना कोणा नातेवाइकाकडे राहून स्वयंपाकपाणी करतांना दिसतात. प्रथम त्या आमचे घरीं आल्या त्या आपल्या उरलेल्या एकुलत्या एक मुलीला वैद्याला दाखविण्याला. जन्मतः आजारी व वाढ खुंटलेली अशी ती बाराचौदा वर्षांची मुलगी सात-आठ वर्षांची दिसे. आईकडून भरपूर सेवा करून घेऊन ती पुढें देवाघरीं गेलीच. पहिल्या चालीप्रमाणें सहाव्या सातव्या वर्षी लग्न झालें. नवऱ्यानें जेवावयास घालण्याएवढे पैसे मिळविले पण इतर उद्योगांमुळें घराकडे व मुलांबाळांकडे पाहिलेंच नाहीं. मुलेंबाळें सातआठ झालीं पण कांहीं बाळपणीं, कांहीं मोठेपणीं आईकडून कष्ट करून घेऊन निजधामीं गेलीं. नवऱ्याचे उद्योग अंगावर आल्यामुळें घर, शेत विकलें जाऊन चाळिशीच्या सुमारास एका रोगी मुलीसह आश्रयासाठीं नातेवाईक शोधण्याचा प्रसंग आला. ती रोगी मुलगीही पुढें गेली व पंचेचाळिसाच्या सुमारास खाली धरणी व वर आकाश अशी स्थिति झाली.

यामुळेंच त्यांच्या आनंदी व विनोदीपणाचें सर्वांना आश्चर्य वाटे. दहा माणसांच्या कुटुंबांत त्या आश्रयाला म्हणून आल्या. डोळे असून पाहायचें नाहीं, कान असून ऐकायचें नाहीं इ. व्यावहारिक धोरण असल्यानें परक्या घरींही सामावल्या व कालांतरानें समरस झाल्या. पहिल्या पिढींतल्या माणसांनीं भिमाक्कांचा संसार पाहिला होता; पण तीं माणसें देवाघरीं गेलीं व तिसऱ्या पिढीला भिमाक्कांचा एका वेळीं मोठा संसार होता हेंही माहीत नव्हतें. त्यांना आठवे तशा भिमाक्का चुलीशीं भाकरी करताहेत. मला तरी कळण्याचें कारण त्यांनींच एकदा सांगितलें म्हणून. रामेश्वराचें दर्शन घेऊन एकदा आम्ही परत येत होतों. तेथील मोठी मंडई, बसची रहदारी व दुकानांची गर्दी पाहून त्या मला म्हणाल्या, “काय जागेंत बदल होतो ग! ही जागा म्हणजे मागें ओसाड मळे व शेती होती. खाजगीवाल्यांच्या बागा म्हणत त्यांना. त्याच्यापलीकडेच आमचा मळा होता. भर दुपारीं एकटें यायला भीति वाटे इथें.”

“म्हणजे पुण्यांत तुमचीं शेतं मळे होते?” मीं आश्चर्यानें म्हटलें, “मग घरही होतं का?”

“होय तर!” ती टकल्याची हवेली आहे ना कसब्यांत! त्याच्या शेजारीं

आमचें घर होतं. होतं लहानच; पण सत्तेचं होतं. आतां तिथें बाग झाली आहे. कंत्राट अंगावर आलं व सारं विकावं लागलं." आणि मग बोलण्याच्या भरांत सारी पूर्वस्थिति त्यांनीं सांगितली. आणि माझी त्यांच्याबद्दलची कल्पना एकदम बदलली. आतांपर्यंत मला वाटे कीं एक दुर्दैवी, दुसऱ्याच्या घरीं कष्ट काढण्यांत जन्म खर्च झालेला, अनुभवशून्य व त्यामुळें निर्बुद्ध व भावनारहित असा हा जीव आहे. पण येवढा संसाराचा पसारा मांडून मोडला व तरीही इतपत उभ्या राहणाऱ्या; तेव्हां या स्थितप्रज्ञ तर नव्हत असें मनांत आलें. तरी पण मानसिक भावनादि गोष्टींची वाढ एकंदरींत कमीच. कदाचित् अति दुःखानें आलेली बधिरताही ती असेल. कांहीं वेळेला नवीन गोष्टी पाहतांना व समजून घेतांना लहान मुलाची उत्सुकता त्या दाखवीत.

नव्याजुन्याची मोठी मौजेची मिसळ त्यांचे ठिकाणीं दिसे. जुन्या पुण्याचें वर्णन, जुनी शेती व रीतीभाती त्या वर्णन करून सांगूं लागल्या म्हणजे नव्या पिढीला अपरिचितपणामुळें त्या आकर्षक वाटत. पण जुनें तेवढेंच सोनें व पुढचें सगळेंच टाकाऊ असें मात्र त्यांना वाटलेलें दिसत नसे.

नव्याची नवलाई पाहून लहान मुलाप्रमाणें त्या गुंग होत व नव्या गोष्टींची माहिती करून घेत. भाचे व नातवंडें मोठीं झालेलीं. त्यांच्या नव्या कल्पना व सुधारकी वागणूक पाहून त्या हसत व नवल मानीत. परंतु या वागणुकीनें आपला अपमान होतो अगर या सर्व नव्या गोष्टी थिल्लर आहेत असें कधीं म्हणत नसत. नातू, नातसुना, नाती एकदम फिरावयास निघालीं, पत्ते खेळावयास बसलीं, बॅड्मिंटन खेळूं लागलीं म्हणजे त्या कौतुकानें पाहत व मग सुनेला म्हणत 'काय ग तुमच्या काळीं हीं सुखं! नाहीं तर आमच्या वेळीं. माजघरांतून ओटीवर डोकावणंही शक्य नव्हतं. उठतां लाथ अन् बसतां बुक्की. सासूपुढंसुद्धां बोलणं होत नव्हतं. तर सासऱ्याशीं व नवऱ्याशीं बोलणं, हसणं, तुमच्यासारखीं उत्तर देणं कुठून ग बाई! काय जग पुढं चाललं!" आणि मग एकादा अवखळ नातू पुन्हा विचारी, "मग तुम्हांला नाहीं वाटत भीमकाका, कीं आपण पुन्हा लहान व्हावं व या मुलींच्यासारखं फिरायला जावं."

स्वतःपुरता देवधर्म व सोवळेंओवळें राखून त्या इतरांना त्यांच्या मताप्रमाणें वागूं देत. त्यांच्या संभाषणांत भाग घेत. आधुनिक मराठी भाषेंत रोजच्या

संभाषणांत होणारी इंग्रजी शब्दांची व कल्पनांची मिसळ त्यांच्या रोज कानीं पडे. त्यामुळें बरेच इंग्रजी शब्द व गोष्टी त्यांना ऐकून माहीत झाल्या होत्या व प्रसंगोपात त्या कल्पनांचा उपयोग करून लोकांना त्या आश्चर्याचे धक्के देत.

कॉलेजला सुट्या सुरू झाल्या. पण त्यांची एक नात– भाच्याची मुलगी– अजून घरीं आली नव्हती. जेवतांना कुसुमच्या आईनें विचारलें, " कुसुमचें पत्र आलें काय? कुसुम केव्हां येणार? "

" खरंच बापू! " भीमकाका स्वयंपाकघरांतून म्हणाल्या, " आपल्या कुसुमचा फोनोग्राफ काय? "

" फोनोग्राफ! " आश्चर्यानें बापू उद्‌गारले.

" तसं नव्हे हो. मला ते तुमचे शब्द नीट येईनात; अहो तिचा सुट्टींतला बेत. तुम्ही कांहीं फोनोग्राफ का कायसं म्हणताना! "

" अहो प्रोग्रॅम! " बापू हसत म्हणाले व तेव्हापासून कार्यक्रम म्हणजे फोनोग्राफ हा शब्द घरांत सर्वमान्य झाला.

नाटक, सिनेमा वगैरेला त्या जात नसत. पण कोणी आग्रह करून नेलेंच तर त्यांतही मोठें अब्रह्मण्य झालें असें त्यांना वाटत नसे; पण रीतीप्रमाणें आपणांस तें आवडत नाहीं, त्यापेक्षां कथापुराण बरें! कारण देवाचें नांव तरी कानीं पडतें असें त्या म्हणत. मौज पाहण्याचा उत्साह मात्र लहान मुलाचा होता त्यांचा. कथा, दिंडी वगैरे तर मुद्दाम पाहतच; पण रस्त्यानें मिरवणूक चालली तरी काम टाकून दारांत येऊन लहान मुलाच्या उत्साहानें पाहत उभ्या राहत. मुलांनीं थट्टा केली तर म्हणत, " अरे डोळे आहेत तों पाहून घ्यावें व कान आहेत तों ऐकून घ्यावें."

एकदां ' आंधळ्याची शाळा ' नाटक त्यांनीं पाहिलें. नाटक चांगलें खरें, पण भिमाक्कांना तें कसें काय वाटलें हें कळण्याची घरांत सर्वांना जिज्ञासा होती. " काय भीमकाका! तुम्हीं म्हणे आंधळ्याची शाळा पाहिलीत. आवडली का तुम्हांला? " बापू.

" कसली आली आहे शाळा न् काय! " नापसंती दर्शवीत त्या उद्‌गारल्या. " सगळीं म्हणतात फार छान आहे! फार छान आहे! पण त्यांत आंधळेही नव्हते व शाळाही नव्हती! "

" अहो तें नाटक होतें."

" मला रे काय माहीत. मला आपलं वाटलं कीं 'राष्ट्रीय शाळा', 'हिंगण्याची शाळा' तसं हें कांहीं असेल. माझी कथा मात्र त्यामुळें बुडाली."

" बरं आतां कुसुमला लिहितों कीं, आज तमि तारीख; चार दिवसांनीं पुण्यास 'आंधळ्यांची शाळा' आहे. पाहूनच ये. पाहूं या तिला आवडते कीं नाहीं."

" काय कौतुकं झालीं आहेत. बापानें मुलीला लिहायचं नाटकं पाहायला थांब." भिमाक्का भाकरी थापीत बोलूं लागल्या. " अहो आमच्या लहानपणीं तें किर्लोस्करांचं शकुंतला कीं कायसं नाटक होई. प्रथम राम रथांत बसून येई व मग सिताबाई झाडांना पाणी घाली. मग शेवटीं दोघांचं लगीन लागे. काय गाणं, काय पोषाख! तुमची आई, मी व वाड्यांतल्या पांचसात बायका चोरून नाटकाला गेलो. घरांत सांगितलं जाऊबाईंच्या माहेरीं सत्यनारायण आहे; व त्यांच्या माहेरून बोलावणं आणवलं. आणि मग माईंना कळल्यावर जेव्हां का त्यांनीं सर्वांना घराच्याबाहेर काढलं तेव्हां चार दिवस डोळ्यांचं पाणी खळलं नाहीं आमच्या! आणि आतां आमचे बापू लेकीला लिहितात कीं चौतीस तारखेपर्यंत थांब व नाटक पाहूनच ये. जें ऐकावं तें नवलच!"

वैदिक लग्नपद्धति, रजिस्टर लग्नपद्धति इत्यादि चर्चा त्या ऐकत असत. त्यांच्या एका नातवाचें लग्न ठरलें. घरांत चहाच्या वेळीं चर्चा चाललीच होती. चर्चा ऐकून शेवटीं त्यांनीं भाचेसुनेला विचारलें, " अग यमुना! आतां हें लग्न व्हायचं म्हणजे इंग्रजी लग्न कीं मराठी लग्न?"

" हें इंग्रजी लग्न हो " त्यांचा भावार्थ ओळखून सूनबाई म्हणाल्या, " या लग्नाला कचेरींत जाऊन सह्या कराव्या लागतात."

" आणखी काय असतं या लग्नांत? आणखी तुमचा तो हनुमान कीं काय तो या लग्नांत असतो ना ग!"

" हनुमान?" सूनबाई घोटाळून म्हणाल्या " इंग्रजी लग्नांत हनुमान कशाला?"

" अग हनीमून!" नातू हसत म्हणाला, " नशीब त्या हनुमानाचं. बिचारा जन्मभर ब्रह्मचारी राहिला त्याचा 'हनीमून' करून सूड घेतलात भीमकाका!"

---

“पण माझ्या नीलाताईला हें मुसुंबं घ्या कीं.” माळीणबाई आग्रह करीत होत्या. “पुरे करा तुमचा आग्रह माळीणबाई.” आक्का रागारागानें सांगत होत्या. “उचला आधीं पाटी. भाजी आणावयाची तर एक सकाळीं लवकर तरी आणावी नाहीं तर संध्याकाळीं तरी आणावी. जेवणाची घंटा झाली; तिकडे जेवणघरांत जाऊं का तुमची भाजी पाहत बसूं.” आक्का खऱ्याच रागावलेल्या पाहून माळीणबाईनें मुकाट्यानें पसरलेलीं फळें व भाजी पाटींत भरली व कालव्याच्या कडेच्या वडाच्या झाडाखालीं जाऊन पाटी उतरली व सावलींत जरा आडवी होऊन विश्रांति घ्यावयाला सुरुवात केली.

आणि असें रोजच होई. माळीणबाईचा मळा होता लहानच; वसतिगृहापासून मैलावर. त्यांत सर्वच प्रकारची भाजी होत नसे. जी कांहीं होई ती काढून सकाळीं लवकर मंडईत न्यावी व मंडईत दिसणारे आणखी नवे नवे भाजीचे व फळांचे प्रकार घाऊक विकत घेऊन मग घरोघरीं भाजी विकावी, त्यांत रोजची कमाई करावी अशी तिची रीत. तिचीं दहावीस ठरलेलीं घरें होतीं. तेवढ्या ठिकाणीं आधीं भाजी विचारावी व मग शेवटीं मुलींच्या वसतिगृहांत जावें. तेथें भाजी—विशेषतः फळें खपण्याची तिला आशा वाटे आणि होईहि तसेंच. वसतिगृहांत येईपर्यंत तिला दहा साडेदहा होत. आपली डोकीवरची पाटी ती व्हरांड्यावर उतरी व फळें पसरून बसे. मुली जेवावयास जातांयेतांना तिच्याभोंवतीं गोळा होत व मग माळीणबाईच्या विक्रीस सुरुवात होई. कुणी पेरू, कुणी मुसंबीं उचलीत व किंमत ठरतांना घासाघीस चाले. रीतीप्रमाणें सांगितल्या किंमतीपेक्षां चार पैसे कमी करून मुली मागत व शेवटीं दोन पैसे कमी करून माळीणबाई देई. पण एकादी मुलगी त्याच दिवशीं गांवांतून मंडईतून आलेली असली तर मग घासाघिशीला रंग चढे.

‘वा ग माळीणबाई!’ एकादी विद्यार्थिनी ओरडून म्हणे. ‘आज बाजारांत चार पैशा शेर शेंगा होत्या व तूं तीन आणे सांगतेस काय?’

‘अहो मालूताई! त्या शिळ्या; पाणी शिंपलेल्या असतील’ माळीणबाई सांगे. ‘चला तुम्ही उद्यां माझ्याबरोबर आणि घेऊन द्या माझ्याजवळ आहेत तशा ताज्या खणतीच्या चार पैशा शेर. मग सबंध पाटीभर शेंगा फुकट देतें तुम्हांला.’ पण माळीणबाईबरोबर चार पैशाच्या शेंगासाठीं कुणी दोन तास

वेळ खर्चून तीन मैल पायपिटी करावयाचें मनांत आणीत नसे व शेवटीं बहुतेक माळीणबाईनें मनांत योजिलेल्या भावाप्रमाणेंच विक्री होई. बरीच भाजी खपली म्हणजे संतुष्ट होऊन ती वर कोथिंबिरीची जुडी, एकदोन केळीं अगर डाळिंब देई. कांहीं मुलींना, विशेषतः आजारी असलेल्या, तर ती रोज मुसुंबीं व डाळिंबें भेट म्हणून देई. वसतिगृहाच्या व्यवस्थापिका आक्का यांच्या नातीवर तिचा फार लोभ. रोज तिला भेटून तिचें कौतुक करून तिचे हातावर कांहीं खाऊ ठेवल्याखेरीज ती कधींच जात नसे. एकंदरींत वसतिगृहाचे जगांत माळीणबाई ही महत्त्वाची व्यक्ति होती किंवा मुलींचे भाषेंत बोलावयाचें म्हणजे 'इंप्रेशन' मारून होती.

पण तिचें चुके तें येवढेंच, कीं हटकून गर्दीच्या वेळीं येऊन पसारा मांडी व वसतिगृहाच्या इतर कार्यक्रमांत घोळ घाली. त्यामुळें पुष्कळदा आक्कांना तिला ताड्दिशीं बोलून घालवून द्यावयाचे प्रसंग येत व तीही तेवढ्या वेळा-पुरती मागें सरे. आक्कांनीं मघाशी तिला रागावून घालवून दिलें खरें, पण जेवणें झालीं, मुली तासांना गेल्या व स्वस्थता मिळाल्यावर आक्कांना आठवण झाली माळीणबाईची. आक्कांनीं समोर दृष्टि टाकली तों दूरच्या एका वडाच्या झाडाखालीं माळीणबाई विसावत आहे व नीला तिच्या शेजारीं बसून तिच्या हातांतील बांगड्या मोजीत आहे! लहानपणापासून आधुनिक वातावरणांत वाढलेल्या नीलेला माळीणबाईच्या वेषाबद्दल फार नवल वाटत असे. [काट-कुळ्या उंच शरीरयष्टीभोंवतीं गुंडाळलेलें तें दंडा घातलेलें जाड धनवडी लुगडें, तें तिचें कपाळभर कुंकू, हातभर बांगड्या, दंडापर्यंत आलेली व मागें कासोट्यावर पडणारी धारवाडी अगर तशाच जाड खणाची चोळी, या सर्वच गोष्टी तिला मौजेच्या वाटत.] तिलाच कशाला मुलींनाही वाटत. सुमति तर म्हणेच, कीं जनाबाई वनदेवापाशीं आली कीं प्रथम कुंकवाचा टिळा दिसतो व मागून जनाबाई दिसते. नीला माळीणबाईजवळ बसे व म्हणे, "जनाबाई, तुझी मनीबॅग दाखीव ना!" आणि मग माळीणबाई दंडावरील चोळीच्या कांठांत दुमडून ठेवलेले पैसे काढून तिजपुढें टाकी.] या पैसे ठेवण्याच्या पद्धतीचें नीलेला कौतुक वाटून दररोज ती त्या मनीबॅगेंतील पैसे मोजी. मग हातांतील बांगड्या मोजी. दहा-बारापर्यंतच अंक तिला तोंडपाठ होते व तेवढें ज्ञान बांगड्या मोजतां मोजतां खर्च होई. माळीणबाई डाळिंबाचे दाणे नीलाच्या हातावर ठेवी व स्वतः चंचींतील सुपारीचें खांड तोंडांत टाकी.

आक्कांनीं माळीणबाईला हाक मारली तेव्हां दोघीजणी वडाच्या सावलींतून उठून वसतिगृहाकडे आल्या.

" अहो माळीणबाई, रोज त्या मुलीच्या हातांत खाऊ देतां हें बरें नव्हे." आक्का रागानें म्हणत.

" जाऊं द्या हो बाई ! पोर मला गोष्टी सांगून करमणूक करते." माळीणबाई म्हणे. " किती वेळ आम्ही त्या झाडाखालीं बसलों होतों."

मग आक्का म्हणत,

" तुला किती सांगतें कीं, भाजी सकाळीं लवकर तरी आण नाहीं तर अगदीं उशीरा तरी आण. साडेदहा वाजतां आलेली भाजी करायची केव्हां?"

" बाई, पण मी तरी काय करूं. घरांत म्हातारा आजारी. पंगु. थंडीचे दिवस, त्यांत त्याचा दमा वाढतो. त्याला शेकून भाकर तुकडा खाऊं घालून निघतें त्यानें उशीर होतो. माझ्या दारांतली उलिशी भाजी; तुम्हांला काय पुरणार. मग मंडईत जायला नको."

" भाजीसुद्धां पुरवत नाहीं, मग वाटतेस कशाला हीं फळं मुलींना ? " आक्का म्हणत.

" राहूं दे बाई तेवढे " नीलाच्या हातांत एक डाळिंब ठेवीत माळीणबाई म्हणे. " बाळ खाईल तेवढाच मला आनंद."

आणि या तिच्या आनंदाबद्दल पुष्कळदा चर्चा होई. आक्कांच्या हाताखालच्या मुली म्हणत, " अहो ही पॉलिसी आहे. नीलाला खाऊ दिला, कीं आक्कांना नाहीं म्हटलें तरी बरें वाटणारच."

" मग ती आजारी मुलींना मुद्दाम चौकशी करून फळें देते ती ? " एकजण प्रश्न करी.

" अग तेंही धोरणच ! " दुसरी. " एक रुपयाचा फायदा झाल्यावर दोन आण्यांचीं फळें दिलीं तर बिघडलें काय ? तोटा तर नाहींच; आणखी प्रेमळपणा मात्र पदरांत पडतो."

" ती कांहीं तुमच्यासारखी स्वार्थत्याग व परोपकार करायला निघालेली नाहीं. कष्टानें मिळविलेल्या रुपयांतले दोन आणे तरी तिनें कमी कां करावे ?" पहिली.

" आणि आजपर्यंत इतक्या माळणी येथें येत होत्या त्यांपैकीं नाहीं ग

कोणी नीलाला व लहान मुलांला खाऊ देऊन वरिष्ठांची मर्जी संपादन करण्याची नाना फडणिशी केली ?" आणखी एकजण शंका घेई.

अशा तऱ्हेनें पुष्कळ वेळा चर्चा होई; पण शेवटीं ठरे कीं, एकंदरींत माळीणबाईला लहान मुलें व विशेषतः आजारी मुली यांबद्दल जास्त ओढ आहे.

आजही नको म्हणतां म्हणतां शेवटीं तिनें नीलाला डाळिंब खाऊं घातलेंच. आक्कांनाही मघाशी आपण जास्त रागावलों असें वाटतच होतें. त्यानीं तिच्या म्हाताऱ्याची चौकशी केली. त्याचा दमा कमी होण्यासाठीं कांहीं औषध दिलें व शिवाय उरलेलें कालवण व ताकही दिलें.

"बाई, तुम्हांला विचारूं का ?" माळीणबाई. "येत्या संक्रांतीला मुलींना घेऊन माझ्या झोपडीवर याल का ? मी काय देणार साऱ्यांना ! पण चार तिळाचे दाणे व गुळाचा खडा. चार हुरड्याचीं कणसं पण भाजीन."

आक्कांनीं व मुलींनीं आनंदानें आमंत्रण मान्य केलें. वासंती, शेवंती तर म्हणाल्याच, या रविवारीं घरच्या सणाला आम्ही जातच नाहीं. या संक्रांतीला माळीणबाईचा तिळगुळ खायचा.

माळीणबाईचा मळा ! मळा कसचा तो. कालव्याच्या कडेला एक जमिनीचा वावभर तुकडा. त्यांत थोडीशी भाजी व फळझाडें आणि कडेला एक खणभर झोपडें. स्वच्छता मात्र पाहण्यासारखी होती. स्वच्छ सारवलेलें अंगण व त्यांत दोन कांबळीं तिनें मुलींना बसावयास बैठक म्हणून पसरलीं होतीं. दारांतच खाट व त्यावर अस्थिपंजर उरलेली म्हाताऱ्याची आकृति. झोपडीच्या दुसऱ्या कोपऱ्यांत चूल व फळीवर लखलखीत घासलेली तवा-पितळी व दोन पातेलीं. झाला माळीणबाईचा संसार. आक्का व मुली कांबळ्यावर बसून माळीणबाईची वाट पाहत होत्या. इतक्यांत शेजारच्या बंगल्यांत पेरूची पाटी ओतून माळीणबाई आली, आक्कांना तिनें नमस्कार केला व तिच्या पद्धतीप्रमाणें मर्यादा म्हणून डोकीचा पदर पुढें सरसावून तोंड फिरवून उभी राहिली.

"पाहूं, माळीणबाई पाहूं !" मुलींनीं एकदम टाळ्या वाजविल्या व म्हणाल्या. हे दागिने दाखवायला बोलावलंत होय आम्हांला. आणि साऱ्या गर्दी करून तिच्या गळ्यांतील पुतळ्यांचं गांठलं, जोंधळी पोत, हातातली अंगठी पाहण्यास गोळा झाल्या.

मुलींच्या पुढें ओल्या शेंगांचें सूप ठेवून माळीणबाई आक्कांकडे वळली.

"वा माळीणबाई!" आक्का म्हणाल्या, नुसत्या भाजीवर बरीच शिल्लक टाकलीत कीं! आज अगदीं सोन्यानं लगडलांत."

"होय आक्का!" माळीणबाई गहिंवरून म्हणाली, "पण हे दागिने भाजीच्या पैशाचे नव्हेत. माझ्या मुलांचं बाळलेणं होतं त्याचे आहेत."

"म्हणजे तुम्हांला मूलबाळ होतं होय? बोलला नाहीं कधीं?"

"तुम्हांला ठावं नाहीं, आज पंधरा वर्षं होऊन गेलीं. पांच मुलं माझ्या घरांत खेळत होतीं. थोरला चवदा वर्षांचा होता. आतां बाप्या झाला असता व घरांत नातवंडं खेळतीं. धाकटी पोरगी तुमच्या नीलाबाई येवढी. ती मोठी तापसरी आली ना अन् एक दिस सारीं एकदम आजारीं पडलों. हा म्हातारा तेवढा उभा; आमच्या साऱ्यांच्या तोंडांत पाणी घाली. मी वायु होऊन पळत होतें म्हणतात. आणि डोळे उघडले तर सारं घर मोकळं! सारीं माझीं बाळं गेलीं आणि मी मात्र मरतां मरतां चंडाळीण वांचलें. म्हातारा तेव्हां उभा पण धक्क्यानें तो खंगला, पाय गेले व बाजेला खिळला. आज पंधरा वर्षं झालीं, भाजी विकिते व म्हाताऱ्याला ओलीकोरडी भाकर घालिते. मला पैसा सांठवाया कशाला व्होवा. मुलांच्या अंगांवरचं किडुकमिडुक म्हाताऱ्यानं काढून ठेवलं व संभाळलं. मी तें पांहायलाच कबूल नसे. पण यंदा म्हातारा म्हणाला "जने! मी थकलों, किती दिवस पुरचुंडी संभाळूं? कोणी तोंडांत देऊन चोरून नेईल तर मला ओरडवत सुद्धां नाहीं. एका डोळ्यानं दिसेना. कुणास ठावं पुढची सक्रांत डोळ्यांनीं पाहतों का? या सक्रांतीला हळदीकुंकु कर व या बाळलेण्याचे दागिने घडवून अंगावर घाल. कुणी पाह्यलंय मी पुढच्या सक्रांतीला तुला पाहतों कीं नाहीं!"

शेंगा खातां खातां मुलींचें लक्ष गोष्टीकडे वेधलें व शेंगा सुपांत तशाच राहिल्या.

  

परत येतांना मुली म्हणत होत्या, "तरीच बरं का जनाबाई नीलावर इतकी माया करते व आजारी मुलींना फळें वाटते."

---

"ही घ्या सुधारणेची चुणूक." भाऊ अभ्यंकर दारांतून येतां येतां म्हणाले.

'सुधारणेची चुणूक ! ती कशी काय ?' गहूं निवडतां निवडतां आई भाऊंकडे पाहून म्हणाली. "म्हाताऱ्या सासूनें गहूं निवडत बसावयाचें व सुनेनें वाचीत बसावयाचें."

आणि जुन्या दृष्टीला विसंगत दिसणारें तें दृश्य होतें खरेंच. सासूबाईंनीं विश्रांति घ्यावयाची अगर पोथी वाचावयाची व सूनबाईंनीं त्यांना मदत करावयाची; निदान सासू काम करतांना वाचीत बसायचें नव्हे. पण घरांत नेहमीं असें उलटेंच होई. ताईला— सूनबाईला वाचनाचा नाद. दुपारीं वेळ मिळाला कीं ती वाचीत बसे. आईलाही दुपारीं झोप घेण्याची सवय नसे. ती कोठलें तरी ठेवणींतलें काम काढी. भाऊ अभ्यंकरांप्रमाणें कोणीं विचारलें म्हणजे म्हणे, 'अहो ! माझ्या आईबापांनीं जर मला लिहायला वाचायला शिकविलें असतें तर मी कशाला हीं आडकामें केलीं असतीं. माझ्या सुना जास्त नशिबवान्; त्यांच्या लहानपणीं लिहिणं वाचणं निघालं. एक सून व्याख्यान देते, एक सून पोथ्या-पुस्तकं वाचते. वाचीनात ! आपला संसार संभाळतात व वर या गोष्टी करतात. मला येत नाहीं म्हणून त्यांनींसुद्धां कां लिहूं वाचूं नये ? त्या वाचतात यांत मला आनंद आहे.' आणि हेंच तिचें जीवनविषयक तत्त्वज्ञान होतें. दादांच्या म्हणजे आजोबांच्या मागें तिनें वीस वर्षें काढलीं म्हणून, [वाटलें तर तिच्या पुढील आयुष्याला निर्माल्य म्हणावें; पण तो कृतार्थ निर्माल्य होता.] यशोदायी जीविताचा एक अवशेष होता. बागेमध्यें पूर्ण उमलून, नंतर देवाच्या मस्तकीं दिवसभर मिरवून आणि दुसऱ्या दिवशीं निर्माल्य म्हणून खालीं उतरल्यावरही कांहीं फुलें टवटवीत दिसतात, त्याप्रमाणें कृतकार्य झाल्यावरही तिच्या मनाची टवटवी कमी झाली नव्हती. जगांत नवीन दिसणाऱ्या गोष्टी ग्रहण करण्यांत तिला आनंद वाटे; जुन्या माणसांनाच अनुभवाचा मक्ता दिला आहे व तो नवीन पिढीला वेळोवेळीं ऐकविलाच पाहिजे असें समजून, येतांजातां ठसाठसा लागणाऱ्या वळचणीच्या वाशाप्रमाणें स्वतःच्या अनुभवाचे बोल ती तरुणांच्या माथीं मारीत नसे. कुणी विचारावयाला गेलांतच तर तिच्या अनुभवाच्या खाणींतलीं मोलवान्

रत्नें पाहावयाला मिळत; नाहीं गेलांत तर तिचा आपला बागेंतला उद्योग बरा व ती बरी! आजोबांच्या पश्चात् तिनें सर्व सांसारिक जबाबदाऱ्या सुनांवर टाकल्या होत्या. तथाकथित सासवासुनांच्या गोष्टीप्रमाणें 'ताकाला नाहीं म्हणणारी सून कोण? तो हक्क माझा—सासूचा आहे' असें म्हणत न बसतां 'काय ताक हवं होय? सूनबाईला मागा, असलं तर देईल' असें ती शेजारणीला सांगेल. कोणीं म्हटलं तर म्हणेल, 'अहो! सुना आतां मोठ्या झाल्या, शहाण्या झाल्या, त्यांनीं जबाबदारी घ्यावी म्हणजे त्याना कळतें. सासूबाई नको म्हणतात म्हणून ताक द्यावयाचें नाहीं असें म्हणण्यापेक्षां केव्हां ताक द्यायचें व नको केव्हां म्हणावयाचें तें त्यांचें त्यांनाच कळलेलें चांगलें नाहीं का? मला स्वतःला करमणूक म्हणून बागकाम व घराची साफसफाई हें कधीं न संपणारें काम आहेच कीं!'

रोज ती मुलं-नातवंडांबरोबर पहिल्या पंक्तीला जेवे व दिवसभर बागेंत काम करी. पण घरांत दोन पाहुणे आलेले दिसतांच मुकाट्यानें भाकरी-पोळ्या करावयास येऊन बसे. सुनबाईला मदत म्हणून केव्हांच केरपोतेरें करून, पहाटे पाणी तापवून ठेवी. कुणा लेकुरवाळीचें लहान मूल रडूं लागलें कीं 'तूं जेव स्वस्थपणें. आण, मी त्याला हिंडवतें' म्हणण्याला तिची तयारी. आणि म्हणूनच घरांत सगळी म्हणत, "आमची आई ना, बँकेंतली ठेव आहे ती! हवी असली तर आहे आणि नको असली तर नाहीं." घरीं पाहुणेमंडळी येत त्यांचें आदरातिथ्य ती नीट करी. विशेषतः प्रो. विजापुरकर, खरेशास्त्री, अशी जुनी, तिची समकालीन मंडळी आली म्हणजे जुन्या गोष्टींना रंग चढे. ते तिच्या मुलांचें कौतुक करून, त्याबद्दल तिच्या कर्तबगारीबद्दल तिला दुवा देत. पण ती स्वतः कधीं आपल्या मुलांच्या मोठेपणाचें व आपल्या कर्तबगारीचें वर्णन लोकांना ऐकवीत नसे. स्तुति ऐकून ती येवढेंच म्हणे, 'अहो, या ऋणानुबंधाच्या गोष्टी. झालं गेलं. त्याचा अभिमान काय बाळगावयाचा! देवाचं देणं.'

मुलांच्या वैभवांत गुंगून न राहतां, तिची दृष्टि कमी पडेल त्याचं करण्याकडे जास्त. ज्याला कोणी नाहीं त्याची ती मायबहीण. आमच्या एका आत्याबाईला चिंता पडली. सासरीं-माहेरीं कोणी नाहीं. बाळंतपणाला कोणाला बोलवावें. आईनें पुढें सरून सांगितलें, 'काशी, तूं रडूं नको. मी येऊन तुझी अडचण दूर करीन.' ज्याला नाहीं कांहीं त्याची ती आई, अशी तिची वृत्ति.

आपला स्वतःचा म्हणून व्यवसाय असावा अशी तिची हौस. त्यासाठींच लिहिणें वाचणें यावें असें तिला पुढें वाटे; पण तें जमलें नाहीं. तिच्या आयुष्याच्या पूर्वार्धांत त्याची कधीं आवश्यकताच कुणाला भासली नाहीं. तिल्या बरोबरीचे घरांतील दीरसुद्धां जिथें निरक्षर—सही लिहितां वाचतां न येणारे होते, तिथें तिला तरी तें आवश्यक कसें वाटावें? पण पुढें तिला त्याची जरूरी पटूं लागली होती. आजोबांच्या दहा दिवसांत सुतकांतच तिनें एक दिवस मला हाक मारून पाटीवर मूळाक्षरें काढून घेतलीं व शिकण्याचा प्रयत्न केला होता. पुढें तिचा पणतू लहान व नात कॉलेजात जाई. तेव्हां स्वाभाविकच नात कॉलेजांतून येईपर्यंत ती मुलाकडे लक्ष ठेवी; व लक्ष ठेवतांना शाळा शाळा खेळून पणजी व पणतू दोघे दोन पाट्या घेऊन अक्षरें गिरवीत. आजी-आजोबा म्हणत, आजपर्यंत पुष्कळ शाळा पाहिल्या; पण पणजी व पणतू एकदम कोणत्याच शाळेंत शिकलीं नसतील.

कष्टांत व गरिबींत तिचा उभा जन्म गेला होता. त्यामुळे काटकसरीच्या व बेताबाताच्या सवयी तिच्या हाडींमासीं खिळलेल्या. नातवंडें त्या मानानें बऱ्या स्थितींत वाढलेलीं; काटकसरीचीं कांहीं ठिकाणें त्यांच्या ध्यानांतच येत नसत. तिच्या जुन्या, शिणलेल्या डोळ्यांना तें बघवलें नाहीं, तर ती तें इतरांच्या लक्षांत आणून देई, पण त्याबद्दल राग मानीत नसे. उलट म्हणे, 'तुमच्या नशिबानें तुम्हांस मिळतें, मी कशाला राग मानूं!'

रात्रीं सर्वांचीं जेवणें होत व शेवटीं ताई जेवावयास बसे. पुण्यांत त्या वेळीं कांहीं वीज आलेली नव्हती आतांसारखी. साधे रॉकेलचे दिवे, मेणबत्या वगैरे लोक वापरीत. ताई जेवत असतां शेजारचा महादेव हातांत मेणबत्तीचा स्टँड घेऊन येई व विचारी "काय ताई! झालं का जेवण? वाचलांत का आजचा केसरी?" आणि केसरीवरून ज्ञानप्रकाश, ज्ञानप्रकाशवरून संदेश व त्यावरून एकंदर राजकारणाच्या चर्चेला सुरुवात होई. घरांतील मुलेंही ताईभोंवतीं जमत, जेवण राही बाजूला व राजकारणाच्या गोष्टींना रंग भरे. आईला मात्र हें पटत नसे. जेवणखाण विसरून ताईसुद्धां सर्वांनीं यांत भान विसरावें याचें तिला नवल वाटे व समोर जळत राहिलेली मेणबत्ती व दिवा तिच्या डोळ्यांत भरे. ती मुकाट्यानें उठे व तिसरा एक दिवा लावून आमचेपुढें ठेवी. मग सर्वांच्या ध्यानांत येई कीं, गप्पांच्या नादांत मेणबत्ती विझविली नव्हती. दोन दिवे उगीच कां जाळावयाचे?

“आई, तूं रागावलीस होय!” असें विचारलें म्हणजे ती शांतपणें म्हणे, बाबांनो! मी रागावूं कशासाठीं. तुमच्या नशिबानें तुमचा बाप पैसे मिळवितो तेव्हां तुम्हांला खर्चाची किंमत कळत नाहीं. माझा संसार जन्मभर मीं एका दिव्यावर केला. दोन खोल्यांचें घर व दोन खोल्यांत मिळून एक दिवली! प्रत्येक खोलीला वेगळा दिवासुद्धां मला माहीत नव्हता. म्हणून तुम्ही एका ठिकाणीं दोन दिवे जाळीत बसतां याचें मला नवल वाटतें. पण रागावूं कशाला? तुमच्या नशिबानें मिळतें तुम्ही उपभोग घ्या. कोकणांतनं देशावर तान्हा मुलगा—नाना घेऊन आले. दूध पाजायला बोंडलंसुद्धां घरनं बरोबर आणलं नव्हतं. घाटांत वडाच्या पानाचा द्रोण केला, त्यानं मुलाला दूध पाजलं, पण काय करायचं तुम्हांला सांगून. आतां या साऱ्या ‘गतगोष्टी’ झाल्या.

आणि मग गोष्टी आईच्या संसाराकडे वळत. आपल्या लहानपणाचे अनुभव व आठवणी ती मोठ्या रंगवून सांगे आणि मग त्या दिवशीं राजकारणाची चर्चा मागें पडे व जुन्या गोष्टींत आम्ही गुंगत असूं.

तिचा छोटा नातू अजाणपणें विचारी, “अग पण तूं दोन खोल्यांत दोन दिवे लावले कां नाहींस? मीं तुला दोन चिमण्या विकत आणून दिल्या असत्या.”

आई हसून म्हणे, ‘अरे तुझाच काय, पण तुझ्या बापाचासुद्धां जन्म झाला नव्हता तेव्हां. तुझ्या आजोबांना बारा रुपये पगाराची नोकरी बारा वर्षें होती. मिरजेला काम होतें व त्या बारा रुपयांत वर्षाला पन्नास रुपये शिल्लक टाकून कोकणांत पाठवावे लागत.

नात आश्चर्यानें पुढें विचारी, “मग तुला दागिने काय काय होते ग?”

‘दागिने! गळ्यांतलं मंगळसूत्र हाच एक दागिना. बारा वर्षं घरांत एकच ताट व एकच तवा होता. भांडंसुद्धां जास्त घेतलं नाही; तेव्हां नवं लुगडं कुठलं व दागिना कुठला! उरेल तो पैसा पैसा मुलांच्या शिक्षणाला साठवायाचा. मी कांहीं तुमच्यासारखं शिकलेली नव्हते. मुलांना शिक्षण कसं द्यावं हेंहि मला येत नव्हतं. मला एकच माहीत होतं : पडेल तितकं काम करायचं व दुसऱ्यांना त्रास न देतां, समाधानांत राहायचं. मुलं शिकून तयार झालीं व माझं काम संपलं. आतां संसार सुनांचा. अप्पा कऱ्हाडला मामलेदार झाला होता, तेव्हां तुमची एक आत्याबाई होती. गेली बिचारी! झालीं पंचवीस वर्षं. तिचं दुखणं वाढलं म्हणून मेण्यांत घातली व मी, नाना, अप्पा गाडी

करून सातारला यावयास निघालों. सातारा निम्मा राहिला व कऱ्हाड निम्मं राहिलं. रानांत मेणा खालीं उतरला व औषधपाणी घालावयास जवळ गेलें. दुधाचा चमचा तोंडांत घातला व मुलगी डोळे फिरवून गप्प झाली. नाना पाठीशीं उभा होता तो म्हणाला, "आई, तूं आतां काय करशील! आपण तर इथं रानांत!" मीं मन घट्ट केलं व सांगितलं 'बाबारे! तुम्हांला त्रास होईल असं कांहीं करणार नाहीं. मेणा उचला व सातारला घरीं पोंचूं या.' घरीं पोंचलों व मग मात्र मला रडूं आवरेना. बाकी तुमचं शिक्षण, विचार मला कांहीं कळत नाहीं रे. मला माझ्या आईनं येवढंच शिकवलं कीं, "आपणासाठीं दुसऱ्याला त्रास होईल असं करूं नये."

---

## देवकाताई : : : ५

"And thou wert still a hope, a love"
"Still long'd for never seen!"

असें मला त्यांच्याबद्दल वाटे. आतांच पहा ना. संध्याकाळीं आम्ही तिघें अंगणांत बसलों होतों. वर्गणीचे निमित्तानें निपाणीला मी जाऊन आलें होतें व तेथें घडलेल्या गमती गंगुताईंना व नानासाहेबांना सांगत होतें. एका विनोदी घटनेचें वर्णन करून मीं म्हटलें, "गंगुताई, तुम्ही बरोबर हव्या होतात; म्हणजे मला हसण्यास कोणी तरी जोडीदार मिळाला असता."

"आमच्या देवकाताई इथें असत्या," गंगुताई म्हणाल्या "तर मी तुमच्याबरोबर खास आलें असतें. त्या घरीं असल्या म्हणजे मला मोकळेपणा मिळतो."

"देवकाताई असली कीं बाईसाहेब मोकळ्या." नानासाहेब म्हणाले व त्यांचा इष्ट हेतु सिद्धीस गेला.

"मी काय सारें काम त्यांच्यावर टाकून एकटी हिंडत बसतें कीं काय?" गंगुताई उसळून म्हणाल्या. "पण कमलाबाईंना एखादे ठिकाणीं घेऊन

जावयाचें म्हटलें तर आतां होत नाही. देवकाताई असत्या तर मी नसतें का निपाणीला गेलें ? ”

“ मीं कधी म्हटलें होतें तुम्ही सारें काम त्यांच्यावर टाकतां म्हणून ! ” नानासाहेब जास्तच शांतपणें म्हणाले, “ आतां तुम्हांलाच तसें वाटत असलें तर वेगळें. ”

आणि यानंतर नेहमींच्या चर्चेला सुरवात होऊन, टिळक मंडळी दिसाव याला शांत पण खरोखर कशी कडक आहेत याचें मोठे रसभरित वर्णन गंगुताईंनीं मला ऐकविलें. ”

“ आमचे मामंजी बोलून चालून रागीट व कडक; पण त्यांचा राग उघड व म्हणून त्यांची मर्जी संभाळणें सोपें. आणि हे मात्र दिसायला शांत, बोलायचे नाहींत. आई म्हणे, ‘ गंगू ! तुझें नशीब म्हणून तुला इतका समंजस नवरा मिळाला. ’ पण शिस्त व कडकपणा यांच्या ठिकाणी मामंजींचा आणि अबोलपणामुळें स्वभाव मात्र सर्वानुमतें गरीब. सुंदरच्या सासरी पाठराखीण म्हणून गेलें होतें. सर्वांनीं आग्रह केला म्हणून चार दिवस जास्त राहिलें. तों यांनीं माझ्याशीं चार महिने अबोला धरला ! कारण टिळक घराण्याच्या नियमितपणाची शिस्त बिघडली ना ! अशीं हीं गरीब माणसं बर कमलावहिनी ! एक देवकाताईंच्यापुढें मात्र सर्व शांत होतात. त्यांना मी म्हणतें, ‘ देवकाताई काय तुमच्यांत असा गुण आहे, कीं सगळी तुमच्यापुढें शात होतात.’ जेवणात सुद्धां ठरलेला जिन्नस ठरलेल्या दिवशी झाला नाहीं कीं राग येतो. पण देवकाताईनीं तोच जिन्नस वाढला तर मुकाटयाने घेतील. ”

अशा तऱ्हेनें कुठून ना कुठून भाषण देवकाताईंचेकडे वळे. शाळेला वर्गणी गोळा करण्याचे निमित्तानें मी नानासाहेबांच्या घरीं पाहुणी गेले व आठदहा दिवस राहिलें. मंडळी अगत्यशील व सार्वजनिक कार्याचें महत्त्व मानणारीं; त्यामुळें माझ्या कामांत गंगुताई व नानासाहेब दोघें आस्थेनें मदत करीत. हळूहळू दररोज किती वर्गणी जमली हें पाहण्याची व आणखी कोणाकडे गेलें तर मदत मिळेल याचा विचार करण्याची माझेप्रमाणेंच त्यांनाही ओढ लागली. गंगुताई घरांत एकटया, त्यामुळें त्यांना मजबरोबर येणें फारसें जमत नसे; नानासाहेब त्यापेक्षां जास्त हिंडूं शकत. रात्रीं जेवणें झालीं म्हणजे आम्ही तिघें अंगणांत बसत असूं व दिवसांत काय काम केलें याची चर्चा करीत

बसूं. आणि कांहीं ना कांहीं कारणप्रसंगानें देवकाताईचें नांव माझ्या कानीं पडे व त्यांना पाहण्याची उत्सुकता वाढे. आपल्या आईला घेऊन त्या गोकर्णाची यात्रा करण्यास गेल्या होत्या व इतक्यांत परत येण्याचा संभवही नव्हता. पण त्यांच्याबद्दल इतकें भाषण कानीं पडे, कीं टिळकांच्या घरांतील नानासाहेब व गंगुताईबरोबरच देवकाताईची मला पक्की आठवण राहिली. वर्ड्स्वर्थनें कोकिळेचें वर्णन केलें आहे ना! कीं, "तुला मीं कधीं पाहिलें नाहीं, तुझें गायन मात्र मी सारखें ऐकतों." तसेंच देवकाताईचें गुणगान रोज माझे कानीं पडे; पण त्या अदृश्य असत व म्हणून त्यांना पाहण्याची माझी उत्कंठा वाढे.

शेवटीं मला राहवेना. "कोण हो या तुमच्या देवकाताई?" मीं एक दिवस गंगुताईंना विचारलें. "आणि हें नांव तरी जरा वेगळेंच वाटतें नाहीं? पुराणांत असले तरी व्यवहारांत हजारांत तरी एखादेंच असेल नसेल."

"अहो, हजारांत जसे त्यांचे गुण तसें हजारांत त्यांचें नांव." नानासाहेब म्हणाले.

नानासाहेबांच्या या वेचक उत्तरावर गंगुताई एक भाष्य करावयाच्या, पण त्यांनाच आज देवकाताईचें वर्णन करण्याची उसळी आली होती. "अगदीं दुर्दैवी व गरीब पोर आहे हो!" त्या सांगूं लागल्या. "त्यांचे वडील व आमचे मामंजी स्नेही. दोघे कर्नाटकात नोकरीला होते. वडील भोळे. एका स्नेह्यानें दिलेल्या माहितीवर विश्वासून मुलीचें लग्न ठरविलें. पण शेवटीं लग्नांत आढळलें कीं, मध्यस्थानें फसविलें व एका उतारवयाच्या पन्नाशीच्या घरांत आलेल्या वराचे गळ्यांत मुलीची माळ पडली. हिंदु-लग्न! फिर्याद करून फसविल्याबद्दल नुकसानभरपाई मिळाली तरी लग्न कांहीं बदलत नाहीं असा विचार करून म्हातारा गप्प बसला खरा; पण त्यानें हाय खाल्ली. त्यांतच प्लेगची वक्रदृष्टि होऊन हें मिळमिळीत सौभाग्यही टिकलें नाहीं व मुलगी दोन महिन्यांत घरीं परत आली. मुलगी घरीं परत आल्या दिवशीं जें म्हाताऱ्यानें अंथरूण धरलें तें शेवटपर्यंत सोडलें नाहीं."

"कसं कादंबरीसारखं वाटतं नाहीं. एखाद्या माणसाच्या वांट्याला दुःख म्हणजे दुःखच!" मीं म्हटलें. "तें तर खरंच! मला तर वाटतें कीं, जगांत भोंवतीं पहाल तर कादंबरींतल्यापेक्षां सुद्धां जास्त दुर्दैवी माणसें सांपडतील." नानासाहेब म्हणाले, "आतां हिच्याच आईचा एक पाय अधू व्हावा व

डोळे कां जावे? प्रथम तिला शिकवण्यावरून आमचे रावबाहेबांचा व देवकाताईच्या वडिलांचा मतभेद झाला व दोघांचा संबंध तुटल्यासारखा झाला. दहा वर्षें दोघे एकमेकांस भेटले नाहींत. पण शेवटीं दादांना—देवकाताईच्या वडलांना—त्यांचाच विश्वास वाटला; व एकच ओळीचें पत्र त्यांनीं लिहिलें. 'मी तर चाललोंच; पण बायको व मुलगी तुमच्यावर सोंपवितो.' त्यांच्या पश्चात् आमच्या रावसाहेबांनीं त्यांना आपले गांवीं आणलें व घरांतच एक खोली देऊन बिऱ्हाड करून दिलें.

"पूर्वींचीं माणसें अशीं असत बरं." गंगुताई! "एकदां शब्द दिला कीं दिला; बदलावयाचा नाहीं. नाहीं तर आतांचे नवे थिल्लर चाळे! आज वचन देतील व उद्यां मोडतील. मागच्या पिढीचा करारीपणा हल्लीं दिसत नाहीं बरं वहिनी!"

"एकवचनीपणा वंद्य तर खराच; व मागचे पिढींत अशीं उदाहरणें सापडत हेंही खरें; पण तो केवळ मागच्या पिढीचाच गुण होता असें नव्हे. देवकाताईच्या वडिलांना फसविणारे 'भद्रेश्वर दीक्षित' मागच्याच पिढींत होऊन गेले ना! एकवचनीपणा हा विशिष्ट पिढीचा गुण नाहीं, तो व्यक्तीचा गुण म्हणा हवा तर! मीं म्हटलें.

"आणि देवकाताई नव्या पिढींतली असली तरी तुमच्या मताप्रमाणें जुन्या पिढीला शोभेल अशी कर्तव्यदक्ष आहेच ना!" नानासाहेब म्हणाले.

आणि चोहोंकडे देवकाताईचें हेंच वर्णन ऐकूं येई. पहांटेपासून उठून स्वतःच्या घरचें काम करील, आंधळ्या आईला हातीं धरून वागवील; पुन्हा मुकाट्यानें येऊन गंगुताईंना मदत करावयास उभी! जगांत उभें राहावयास स्वतःची एक खण जागा नसतां रावसाहेबांनीं आधार दिला याबद्दल साहजिकच मायलेकींना कृतज्ञता वाटे. म्हातारी बिचारी आंधळी; तोंडी कृतज्ञतेपेक्षां काय देणार! पण देवकाताई चतुर व शहाणी. शब्दानें उच्चार न करतां आपल्या कष्टानें तिनें सर्वांस इतके आपलेसें करून घेतलें होतें कीं, त्या घरांत देवकाताई म्हणजे एक अविस्मरणीय व्यक्ति झाली होती. सिंधूच्या दुखण्याच्या गोष्टी निघाल्या कीं देवकाताईनें केलेल्या शुश्रूषेचा उल्लेख आलाच. चंपीच्या सासरीं संक्रांतीचा सण पाठविला म्हणून सांगतांना देवकाताईनीं केलेले हलव्याचे दागिने कळत. गंगुताईंना घरकामांत विश्रांति देणाऱ्या, शिवाय बहिणीप्रमाणें सुखदुःखाच्या गोष्टी बोलण्यास उपयोगी पडणाऱ्या

म्हणून गंगुताई दिवसांतून चार वेळां त्यांचा उल्लेख करीत. नानासाहेब उल्लेख करीत नसत तरी गंगुताई मात्र त्यांना जाणवीत कीं, 'आज माझें चुकलें तसें देवकाताईचें चुकतें तर तुम्ही तिला बोललां नसतां.' नानासाहेब येवढेंच म्हणत कीं, "अहो, तुम्ही आम्ही टाकून बोलणें येवढेंच तिच्या दुर्दैवांत कमी आहे. आणि शिवाय मी तिला बोललों तर तुम्हांला तरी खपेल का?" आणि लागलीच माझेकडे वळून म्हणत, तुम्ही सातारला गेलांत म्हणजे कोणाला सांगू नका बरं का, कीं घरीं आम्ही रोज भांडत होतों म्हणून." आणि या सर्वांमुळें देवकाताईना पाहण्याची माझी उत्कंठा जास्तच तीव्र होई. लोकांना त्यांच्याबद्दल काय वाटतें तें कळलें; पण त्यांना स्वतःला आपल्या बद्दल काय वाटतें हें कळण्याची मला उत्सुकता लागे. आपल्या दुर्दैवाच्या जाणिवेनें त्या दुर्मुखलेल्या असतील का? का आपल्या दुर्दैवाच्या तीव्रतेची कल्पना त्यांना आलीच नाहीं? आणि नाना वहिनींसारखीं माणसें आहेत म्हणून ठीक. नाहीं तर स्वतःच्या स्थितीबद्दलची त्यांची उदासीनता योग्य आहे का? मनुष्यानें स्वावलंबी होण्याचा विचार करूं नये का?" असें किती विचार मनांत येत.

* * *

पुढें दोन वर्षांनीं एका कार्यप्रसंगानें मला पुन्हा गंगुताईचे घरीं जाण्याचा योग आला. टांग्यांतून उतरून दारांत येतें तों पंक्तींत वाढावयास जिलब्यांचें ताट घेतलेली, सुस्वरूप प्रौढ स्त्री एकदम पुढें झाली व हसत म्हणाली, "या! आम्ही सारी मंडळी तुमची केव्हांची वाट पाहत आहोंत" मागोमाग घरांतून नानासाहेबांचा शब्द ऐकूं आला, "देवकाताई, टांग्यांतून कोण मंडळी आली पहा बरं." व याच देवकाताई याबद्दल शंका उरली नाहीं. ह्या देवकाताई! मीं चमकून पुन्हां त्यांच्याकडे नखशिखांत दृष्टि टाकली. या बाईचे चेहऱ्यावर तर देवतेचें तेज वाटलें मला. आणि दुर्दैवी, असहाय, अनुकंपनीय म्हणून इतकें दिवस मी ज्यांचें वर्णन ऐकत होतें त्याच का या बाई! या तर अनुकंपनीय वाटत नाहींत. पुन्हा एकदां मीं डोळे भरून त्यांचेकडे पाहिलें. एक साधेंसें वस्त्र, अलंकार नाहींत. पण दैवानें चुकून दिलेल्या रूपसंपदेला मनमोकळ्या तोंडभर हास्याची जोड दिसत होती. निर्मळ हास्य येवढा अलंकार त्या निर्माल्यावर चढला होता.

---

आपल्या लग्नाच्या पन्नासाव्या वाढदिवसानिमित्त आण्णांनीं व बायानें आज आम्हांला येथें बोलावलें आहे. उपस्थित असलेल्या आप्तस्वकीयांतर्फे मी त्या उभयतांचें मनःपूर्वक अभिनंदन करितें." शकू म्हणाली. ती पुढें म्हणाली, " मला खरंच आश्चर्य वाटतं कीं, लग्न करून पन्नास-पन्नास वर्षें ही माणसं न भांडतां एकत्र काल कसा घालवूं शकतात ? कारण लग्न ही परिस्थिति मला दोन वर्षांपेक्षां जास्त झेपली नाहीं." सहजच मंडळी हसूं लागली. 'आणि मला बायाचं जास्त कौतुक वाटतं त्याबद्दल. तुम्ही सर्व आण्णा मोठे, साधु, महर्षि असं वर्णन करतां; आणि त्यांच्यामुळें बाया संसारी, भांडखोर ठरते. पण बरोबर वागायला आण्णा फार वाईट. घरांत भांडण नाहींत. मुकाट्यानें पुन्हां करायचं तें सोडत नाहींत. त्यामुळें बायाचें बोलणें मात्र लोकांना दिसतें. घरांत जरा भांडायला अवसर मिळाला म्हणजे मनुष्य बाहेर भांडेल कशाला ? शिवाय घरांत आण्णा कांहींच पहात नसत. तेव्हां आण्णाचा संसार चालविला कुणीं ? पण तिचं कोण वर्णन करतं ? ती कांहीं कुणी विभूति नव्हे ! तेव्हां या यशस्वी वैवाहिक आयुष्यक्रमाबद्दल मला बायाला धन्यवाद द्यावेसे वाटतात."

माझ्या शेजारीं बसलेले माझे एक स्नेही म्हणाले, " माझं तर बरोबर उलट मत आहे या बाबतींत. आण्णांनीं मोठं काम काय केलं व कां लोक त्यांना साधु व विभूति म्हणतात हे कांहीं मला कळत नाहीं. पण बायाबरोबर त्यांनीं पन्नास वर्षें संसार केला यावरूनच मी त्यांना विभूति मानायला तयार आहें." हें पहा हें आपलं परक्या माणसाचं मत. खुद्द बायाला काय वाटतं याबद्दल हें आपण पाहिलं पाहिजे.

आणि तुम्हांला बायाचं मत हवं असेल तर तें समजून घेणं कांहीं कठीण नाहीं. सरळ जाऊन तिला विचारावं. ती तितक्याच सरळपणें तुम्हांस सर्व माहिती सांगेल. मला कांहीं वेळेला तिच्याशीं बोलणें फार आवडतें. आपल्याला एकाद वेळ करमत नसावें म्हणजे बायाजवळ जाऊन बसावें व एक प्रश्न विचारावा. ती माहिती सांगायला सुरवात करते. मी पुष्कळ दिवस तिच्या शेजारीं राहिल्यामुळें तिची पुष्कळशी माहिती मला मुखोद्गत झाली आहे. पण पुन्हा आपल्याला हवें तितकें ऐकावें व नको तेव्हां सरळ उठून जावें, ह्याबद्-

ल्ही ती चिडत नाहीं अगर अपमान मानून घेत नाहीं. हेंच तर तिच्या स्वभावांतलें वैशिष्ट्य मला फार आवडते.

जन्मभर कष्ट केलेले. त्यामुळें झिजलेलें तरी कणखर हाडपेर. एक वेळचा मूळ उजळ वर्ण व तरतरीत नाकडोळे, पण आज माल सत्तरी उलटल्यामुळें जरापन्न दिसणारा, काळवंडलेला, सुरकुतलेला चेहरा व कमरेला आलेला बांक. तरी पण जातीची निरोगी प्रकृति व त्याहून निरोगी असा स्वयंभू आशावाद. भाग्यवान् तर ती खरीच. संसार केला तो पूर्णपणें यशस्वी झाला. स्वतः संसार संभाळून आण्णांना आश्रमाच्या कामास मोकळीक दिली म्हणून त्याचं श्रेय तिला. पुन्हा मुलें शिकून विद्वान् झालीं, नांवारूपाला आलीं, त्यांचेंहि यश तिच्या हाताला. मुलें, सुना, नातवंडें, नांवलौकिक, मिळून काय, संतति व संपत्ति तिला पूर्ण आहे. यामुळें कृतार्थ माणसाचें समाधान तिला आहे. पण संपत्तीचें व तिचें खडाष्टक दिसतें. संपत्ति आहे, पण भोगावयाची नशिबीं नाहीं. 'दैव देतें व कर्म नेतें' तें असें. लहानपणीं कष्ट केले, काटकसर करावी लागली, पण तीच पुढें संवय होऊन अंगीं इतकी बाणली कीं, आतां खोड होऊन बसली आहे. कुणी प्रेमासाठीं प्रेम करतात, कुणी कर्तव्यासाठीं कर्तव्य करतात, तर आमच्या बायाची आपली 'काटकसरीसाठीं काटकसर.' जरूर असो नसो प्रत्येक गोष्टींत कुठें तरी काटकसर केल्याखेरीज तिचे समाधानच होत नाहीं. 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।' हा उपदेश जणूं तिच्या काटकसरीसाठीं भगवंतांनीं केला होता. तूं आपली काटकसर कर, त्याची उपयुक्तता असो, नसो. आज तिला तुम्ही दोन अंजीर नेऊन द्या. कालचीं सुकलेलीं द्राक्षें अगर इतर फळें उद्यां जास्त सुकतील म्हणून आज आण्णांना देईल आणि आजचे ताजे अंजीर दोन दिवस सुकले म्हणजे आतां ते फुकट जातील म्हणून खावयास काढील. मी पुष्कळदां रागानें म्हणतें, "ताजा जिन्नस खायचें तुमच्या नशिबींच नाहीं का?" एकदां कोणत्या तरी नव्या चित्रपटाचा—मला वाटतें 'देवता'—उद्घाटनसमारंभ आण्णांच्या हस्तें झाला. बायाही आण्णांच्या बरोबर गेली होती. दुसऱ्या दिवशीं एका कॉलेजच्या विद्यार्थिनीनें विचारलें, "बाया, तुला कालचा चित्रपट कसा आवडला?"

"मला नाहीं तुमचे हे खेळ न् चित्रं आवडत. त्यांनीं बोलावलं, मुद्दाम मोटार पाठविली, नाहीं तरी मला गांवांत जायचंच होतं म्हणून गेलें झालं त्या मोटारींतून." जवळच उभ्या असलेल्या आणखी एक-दोन विद्यार्थिनी

म्हणाल्या, "पण बाया, आतां ते तुला अभिप्राय मागायला येतील कीं, 'देवता' पाहून मला काय वाटलें!"

दुसरी विद्यार्थिनी म्हणाली, "बाया, मी सांगू तुला त्यांतलं काय आवडलं असेल?" इतके हजार-पांचशें लोक जमलेले पण दोन तीन तास मुकाटयानें समोरचें चित्र पहात चित्रासारखे बसतात. दिवे जाळीत नाहींत. कारण सर्व थिएटरांतले दिवे लावून ठेवायचे म्हणजे किती बिल होईल!"

"तुम्हीं असं म्हटलं म्हणून मी काय बोलायला सोडीन का?" बाया त्यांना म्हणाली. "नाहीं तरी तुम्ही मुली दिवे उगीच जाळतां. एकेका खोलींत दोनदोन दिवे ग कशाला? एक दिवा लावावा व दहा जणींनीं भोंवताली बसून वाचावं."

"मग तुझा अभिप्राय असा होईल तर! 'देवता चित्रपट बरा आहे; पण कंपनीची शिस्त व व्यवस्था फार चांगली आहे. एवढ्या मोठ्या थिएटरांत हजारपांचशें लोक चित्र पहात बसतात; पण दिवे जाळीत नाहींत. सिनेमा कंपन्यांत भरमसाट खर्च होतो म्हणतात, पंण या कंपनीची काटकसर वाखाणण्यासारखी आहे. शिक्षणसंस्थांनीं सुद्धां यापासून धडा घ्यावा व रेसिडेन्सींत जळणारे दिवे कमी करावेत."

"मोठ्या चुरुचुरु बोलतां ग तुम्ही." बाया रागावून तरी कौतुकानें म्हणाली. "बापाचे घरून पैसे येतात म्हणून कळत नाहीं. तुम्हांला काय माहिती संसार कसा करावा लागतो तें? तुम्ही कांहीं म्हणालांत तरी मी काटकसर सोडणार नाहीं."

दुपारीं दहाअकराची वेळ. कर्वे रोडवर ठाकरसी कॉलेजच्या जवळील एका बारक्या पुलावर बसून बाया रस्त्यांतून जाणाऱ्या वाहनाची वाट पहात बसली होती. मीही थोडा वेळ होता म्हणून कॉलेजकडे जातां जातां तिच्याशीं बोलत उभी राहिलें.

आफ्रिकेंत आपल्या डॉक्टर मुलाकडे ती वर्षभर जाऊन आली. तेव्हां ती पांच वारी लुगडीं नेसूं लागली. लुगड्यांचे रंग सुरेख डोळ्यांत भरणारे, डोक्यांत कसलीं तरी फुलें खोचलेलीं. "वाहवा बाया!" मीं म्हटलें, "तूं तर आतां अगदीं फॅशनेबल बनलीस कीं!"

" कां नाहीं फॅशनेबल बनणार!" बाया जोरानें म्हणाली, " अग, माझे मुलगे मोठे झाले. पैसे मिळवतात, मला देतात तर मीं कां नाहीं फॅशन् करूं?" आणि मग शंकर आफ्रिकेंत कसा नामांकित डॉक्टर म्हणून प्रसिद्ध आहे, कसे पैसे मिळवतो व खर्चेही करतो याचें वर्णन तिनें मला ऐकविलें.

" फार छान!" मीं म्हटलें, " तुझीं मुलें उदार आहेत. तूं आजपर्यंत पुष्कळ कष्ट केलेस. आतां सुखानें त्यांच्याजवळ रहा."

" अग तेच तर जमायचं नाहीं. मला आफ्रिकेंत कंटाळा आला. स्वतंत्र खोली, बिछाना, विजेचा पंखा आणि सारखे येतां जातां नोकर. मला बसून राहायचा कंटाळा आला. आणि हीं शंकरानं सहा लुगडीं एकदम आणलीं. म्हणे हीं लुगडीं नेसूनच हिंडत जा आणि वर्गणी मागत जाऊं नकोस."

" मग चागलं केलं कीं त्यानं. एवढ्या मोठ्या नामांकित डॉक्टराची व कॉर्पोरेशनच्या प्रमुखाची तूं आई. कसलीं तरी लुगडीं नेसून हिंडलेली त्याला बरं दिसेल का?"

" मोठा आला आहे नामांकित डॉक्टर व कार्पोरेशनचा मुख्य! मीं लहानपणीं त्याचे कष्ट केले, त्याला शिकवलं तें ह्याच माझ्या जुन्या कपड्यांनिशीं ना? मीं त्याला साफ सांगितलं कीं, तुझी आई म्हणून मला मुळींच ओळखायला नको. माझा मुलगा तूं असंच लोकांनीं म्हटलं पाहिजे." आतां मात्र तिचा स्वाभिमान दुखावला. " मीं कष्ट केलें म्हणून मुलं मोठीं झालीं, नाहीं तरी कर्वे घरांत काय बघत होते?" असें म्हणून आपल्या प्रपंचाचा इतिहास तिनें पुन्हा एकदां मला ऐकविला. " आणि हीं पांच वारी लुगडीं तरी काय? कंबर वाकली, नऊ वारी लुगडीं आतां मला उचलत नाहींत. तेव्हां चार वार फाडून काढलें. त्याला एक एक वाराचे माझ्या जुन्या लुगड्याचे धडपे जोडले आणि एकाएका लुगडयाचीं दोनदोन लुगडीं केलीं."

" अस्सं! म्हणजे यांतसुद्धां तुझी फॅशनपेक्षां काटकसरीची दृष्टि आहे तर!" मीं हसून म्हटलें. " पण बाया! जरूर तेव्हां काटकसर केलीस तें ठीक. पण आतां तुला काय कमी आहे?" मलाही व्याख्यान द्यावयाची लहरच आली होती. " भरपूर कर्तव्य केल्यावर व दुसऱ्याचं आयुष्य सुखकर करण्याचा प्रयत्न केल्यावर स्वतः सुखानं राहावयाचा आपल्याला सुद्धां हक्क आहे. इतके दिवस तूं हिंडून वर्गणी गोळा केलीस. आतां तुला चालवत नाहीं, तेव्हां काम

करूं नको. करायचंच तर वाहनखर्च कर. आतां तूं इथें बसणार. छकडा, टांगा मोटार जें सांपडेल तें थांबविणार. हा काय लोकांवर जुलूम!"

"अग, पण त्यांची मोकळी सीट फुकटच जात असते ना."

"जाईना! तूं आज कमींत कमी तीसचाळीस वर्षे लोकांच्या वाहनांचा फायदा घेतलास. तेव्हां तूं चार महिने तरी असा नियम कर, कीं रोज टांग्याला चार आणे खर्च करायचे. स्वतः बसल्यावर जी दुसरी सीट मोकळी राहते त्यावर रस्त्यांत कोणी गरजू भेटेल त्याला बोलवावयाचें."

"हें माझ्या हातून या जन्मीं होणें शक्य नाहीं." तिनें ताडदिशीं मला स्पष्टपणें सांगितलें. "मी बसलें नाहीं म्हणजे हे लोक काय टांगे, मोटारी चालविल्याशिवाय राहणार आहेत!"

"इथून जवळ आगगाडीचा फाटा गेला नाहीं म्हणून. नाहीं तर रोज तुम्ही रुळांवर उभ्या राहून आगगाडी सुद्धां थांबवाल." 'आणि त्याला काय हरकत आहे? नाहीं तरी वांचवलेले पैसे मी अनाथ मुलांवरच खर्च करते ना!' आणि गरीब मुलांना मदत करायचें तिचें वेड आहे खरेंच. इतर कांहींही असो. ज्याला कोणी नाहीं त्याचें धांवत जाऊन तीच करील. जन्मतांच आई वारली, बाप गरीब, अशीं मुलें उचलून आणून त्यांच्या खस्ताही बायानेंच खाव्या. आणि तीं मुलें वाढूं लागलीं म्हणजे त्यांचें कौतुकही करावें. तिचा कृतकपुत्र विठू तिनें असाच वाढवला. कोणींही एवढा पेढा दिला तरी तो संभाळून त्याला ती आणून देई. त्याला शिकवी, गोष्टी सांगे व म्हणे 'विठू, तूं चांगला शिकून तयार हो; तुला मी हिंगण्याचा लाइफमेंबर करीन.' त्याची सर्व तर-तूद ती करी. अर्थात् तिच्या अंगीं मुरलेल्या याचना करण्याच्या पद्धतीनें कोणाकडून पुस्तकें. कपडे, धान्य मागून आणील, शाळेंत नादारी मिळवील. त्याचा अभ्यास कमी पडला तर अण्णांना रोंज एरंडवण्याहून शिकवण्यासाठीं हिंगण्यास पाठवील. "सगळ्या जगावर परोपकार करतां मग माझ्या मुलाला एवढा शिकवत जा की." ती म्हणे व अण्णाही रोज जाऊन त्याला बेरीज, वजाबाकी काय तें शिकवून येत. दुसऱ्या एका घरच्या मुंजीच्या वेळीं जाऊन त्याची धर्ममुंजही तिनें करविली. मनांत आलें म्हणजे ती गोष्ट पुरी करावयाची हें आण्णांचें वैशिष्टय, तर मनांत आलेली गोष्ट पुरी करावयाची पण स्वतः खर्च न करतां परस्पर परोपकार साधून करावयाची, हें तिचें वैशिष्टय!

लहान मुलांबद्दल जिव्हाळा तसाच गरिबाचा कळवळा व निर्भयपणा. एक आप्त बाई वारली. तिची इच्छा प्रेताला सुद्धां पुरुषाचा स्पर्श होऊं नये अशी होती. बाया छकडा करून मृतदेह छकड्यांत घालून स्मशानांत त्याचें दहन करून आली. अशा वेळींही ती भ्यावयाची नाहीं.

तिच्या काटकसरीखेरीज व परस्पर परोपकार करण्याच्या सवयीखेरीज, मला इतर किती तरी गोष्टींबद्दल कौतुक वाटतें. कर्तृत्व आहे. बुद्धिमत्ता तिजजवळ आहे, वादविवाद करायला चांगली आहे. पुष्कळदां बोलूं लागली म्हणजे इतकें बोलतें व तुम्हांला नको असेल तेव्हांही बोलत राहते; त्यामुळें मी सर्वांना सांगत असतें कीं, माझी एक अतृप्त महत्त्वाकांक्षा आहे, बायाकडे जायचं आणि मुद्द्याला सोडून इतकं कांहीं तरी बोलत बसायचं, कीं तिनं कंटाळून म्हटलं पाहिजे "ही कमळाबाई कांहीं तरी बोलते. मला ऐकून कंटाळा आला!" पण अजून तरी या चढाओढींत तिचीच सरशी आहे. पण हें विसंवादी भाषण सोडलं तरी कांहीं वेळां ती अशी सुंदर व मुद्देसूद उत्तरं देते कीं, स्त्रिया प्रत्युत्पन्नमति असतात हें एकदम पटतें.

एकदां तिची सून इरावती कोकणांत जाऊन आली. तिच्या तोंडचे नवऱ्याला उद्देशून म्हटले जाणारे 'दिनु–दिनु' शब्द साहजिकच तिथल्या लोकांना चमत्कारिक वाटले. तिची एक मैत्रीण पुढें तिला भेटावयास आली असतां विचारूं लागली, "अग बाया, हें काय? तुझ्या सुना नवऱ्यांना अरे तुरे म्हणून नांवानं कां हाका मारतात? एक शंकर शंकर म्हणते; एक दिनु म्हणते; आतां तिसरी काय 'भाकऱ्या' म्हणणार आहे?"

बायाचा गुण म्हणजे आपल्या मुलांचें व सुनांचें कौतुक करून त्याना संभाळून घेणें "मग काय बिघडलं त्यांनीं नवऱ्याचं नांव घेतलं तर? ती उलट विचारील, "मी माझ्या मुलांचीं 'शंकर', 'दिनकर', 'भास्कर' अशीं जीं छान छान नांवं ठेविलीं आहेत तीं सुनांनीं घ्यावीं म्हणूनच. मला तर उलट आवडतं त्यांनीं नवऱ्याचं नांव घेतलेलं."

"मग तूं कां घेत नाहींस कर्त्यांचं नांव?"

"अग, मीं सुद्धां घेतलं असतं चांगलं असतं तर! पण त्यांच्या आईबापांनीं त्यांचं नांव 'धोंड्या'च ठेवलं त्याला काय करूं?"

भांडायला ती कोणाला हटायची नाहीं. पण discretion is better part of valour हेंही तिला कळतें; व प्रतिपक्षी खरोखरच खंबीर आहे असें दिस-

तांच असा आपला पवित्रा बदलते व परपक्षावर अशी मात करते कीं, प्रतिपक्षी रागवावयाचें विसरून कौतुकानें हसूंच लागतो. त्या दिवसाची मला चांगली आठवण आहे. आपले वामनराव जोशी म्हणजे तात्या, एकदां हिंगण्याहून आले ते हसतच आले. तेथल्या शाळेचे सुपरिंटेंडेंट होते ते तेव्हां. "अहो इतकें हसतां कां?" मीं विचारलें.

"बायाचें व माझें व्हावयाचें होतें भांडण; पण बुद्धिकौशल्यानें शेवटीं बायानें जिंकलें." तात्या सांगू लागले. "बायाची सांभाळलेली मुलगी लिली यंदा व्हर्नाक्युलर फायनलच्या वर्गांत आहे. ही तिला धड पुस्तकें देईना, शिवणाला कापड देईना, त्याचा आधीं मला आला होता राग. शिवाय पूर्वपरीक्षेंत नापास होणाऱ्या मुलींना परीक्षेस पाठवावयाचें नसतें. हिची लिली नापास होणार व मग फॉर्म देण्यासाठीं बाया माझ्या ऑफिसांत येऊन बसणार, हें सर्व मला दिसत होतें. मींही या वेळीं ठरवलें होतें कीं, बायाचें कांहीं ऐकावयाचें नाहीं. तेव्हां भांडणाची वेळ आली म्हणजे काय, कसें उत्तर द्यावयाचें हें सुद्धां ठरवून ठेवलें होतें! मी म्हणणार होतों, "तुला वाटत असेल. मी बाया आहे; अण्णांची बायको आहे; पण मी येथें कोणाला ओळखीत नाहीं." ऑफिसांत तिची वाट पाहत बसलों होतों. पण माझी राघोबादादाची चाल तर तिची अहल्याबाईची चाल! ती ऑफिसांत शिरली. "काय पाहिजे?" मी तुटकपणें विचारलें.

"माझ्या लिलीला तुमच्या शाळेंतून परीक्षेस पाठवावयाची नाहीं." बाया म्हणाली, "त्यासाठीं मी तुमच्याकडे आलें नाहीं, कोणाही दोन सद्गृहस्थांच्या सह्यांनिशीं अर्ज केला कीं विद्यार्थिनीला खाजगी तऱ्हेनें परीक्षेस बसतां येतें. लिलीला मी तशी परीक्षेस पाठवीत आहें. दोन सद्गृहस्थांपैकीं पहिली सही कर्व्यांची घेतली आहे. दुसरी तुमची करतां का?"

मुकाट्यानें फॉर्म घेतला व आण्णांच्या सहीखालीं सही केली. शाळेंतून मीं लिलीला दुष्टाव्यानें थोडीच पाठवीत नव्हतों म्हणून इतर मार्ग तिचा मीं अडवून धरावा? पण माझी भांडणाची तयारी फुकट गेली एवढंच वाईट वाटलें."

"पण शेवटीं पुढं काय झालं?"

"पुढं काय व्हायचंय! इतक्या कसोशीनें पाठविलेल्या आश्रमाच्या मुलींपैकीं शेवटीं कांहीं मुली झाल्याच नापास. पण बायाची लिली झाली पास!"

---

"आम्ही काय कुणाचें खातों रे।
तो राम आम्हांला देतो रे॥"

पुढें लाविलेल्या सरकपडद्याचे मागून अभंगाचे स्वर ऐकूं येऊं लागले. नानानें भरभर पडदा एका बाजूस ओढला आणि आंतील देखावा बाहेर बसलेल्या प्रेक्षकांस दिसूं लागला. नाना रंगभूमीच्या एका टोकाला सरकपडदा धरून हातांत-शिटी घेऊन उभा होता. बाळमामानें तबलजीचा आव आणला होता व उषाक्का पेटीवर साथ करीत होती. पाठीमागें सरस्वतीचा मोरावर बसलेला फोटो लावला होता. 'नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते' असा श्लोक बाबामामाचें रेखाज्ञान व कुंदुमाईचें संस्कृतज्ञान यांचें संमेलन होऊन सुंदर अक्षरांत सरस्वतीचे चित्राखालीं लिहिला गेलेला दिसत होता. मध्यभागीं एक व्यासपीठ ठेवलें असून त्यावर कुसुमताईनें नेसविलेल्या लुगड्याचा पदर मोठ्या ऐटीनें सरसावीत 'कमासाहेब' बसल्या होत्या. हातांत चिपळ्या व पुढें पोथीसारखा मांडलेला टाइम्सचा अंक. व्यासपीठाचे पुढें उदबत्त्या लावल्या असून मध्यें एक चांदीचें ताट—भाविक लोकांना तांदूळ, पैसे टाकण्यास उपयोगी पडावें म्हणून—ठेवलें होतें. येथें अंथरलेल्या जाजमाची मर्यादा संपून गेली होती व पुढच्या जमिनीवर सकाळीं काढलेल्या रांगोळीपैकीं 'शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्' हीं अक्षरें ठळकपणें सर्वांच्या डोळ्यांत भरत होतीं. लहान मुलेंबाळें व रिकामी पाहुणेमंडळी आधींपासूनच जागा धरून बसली होती. आप्पासाहेब येण्यासाठीं पडदा दूर होण्याचें एवढा वेळ थांबलें होतें. तेही ऑफिसांतून परत आले. ते आल्याचें दिसतांच तबल्यावर थाप पडली. पेटीचे सूर दोन-तीन एकदम निघाले, त्या दोहोंपेक्षां अगदीं स्वतंत्र असा अभंगाचा ध्वनि आला, नि धावत धावत नानानें पडदा दूर केला. आंतल्या अनपेक्षित देखाव्यानें सर्वच जण इतके गुंगून गेले कीं, 'मुलांनीं केलं आहे तरी काय हें' असं म्हणून निरखून पाहण्यांत तबला, पेटी व गायन परस्परांस विसंवादी होतीं हें कोणाच्या लक्षांतच आलें नाहीं व पुढें 'कमासाहेबांचें' प्रवचन सुरू झाल्यावर तबला-पेटी बंदच पडली. पडदा दूर सरतांच दाराशीं वांकून पाहणारी सरू मोलकरीण एकदम धावत स्वयंपाकघराकडे गेली व आत्याबाईंना सांगूं लागली, "चला चला लवकर. कमासाहेब पुराण सांगत

ह...३

आहेत. त्यांना साडी नेसविली आहे व कशा आईसाहेबांच्या सारख्या दिसताहेत." कमाताई पुराण सांगते म्हटल्याबरोबर आत्याबाईंनीं चिरोटयाचे भिजविलेलें पीठ तसेंच कपाटांत सारलें व भरल्या हातांनींच प्रथम दाराशीं येऊन वांकून पाहून मग त्या हात धुवून पुन्हा बाहेर येऊन बसल्या. आईसाहेब तर आधींच येऊन बसल्या होत्या. घरांतील उरलीसुरली मंडळी येऊन बसली इतकेंच नव्हे, तर आसपासची शेजारी मंडळीही एकामागून एक आली व 'हाउस फुल्ल'ची पाटी लावण्याची वेळ येणारसें वाटूं लागलें. बाबा म्हणालासुद्धा, "अग कुंदुमाई, किती मंडळी आहेत याची आधीं नीट कल्पना कां दिली नाहींस ? म्हणजे प्रथमच बैठक वाढविली असती."

"अरे पण हें पुराण फक्त घरापुरतेंच करायचें ठरलें नव्हतें का ? मग मी जास्त मंडळी कशी बोलावीन ?" कुंदा.

"हें कमासाहेबांचेंच काम असलें पाहिजे." कुसुम एकदम आठवण करून म्हणाली. "तरीच दहा वाजतां स्वारी मी जरा फिरून येतें म्हणत होती. तिनें हीं बोलवणीं केलीं असणार."

एवढा वेळपर्यंत आप्पासाहेब ऑफिसचा पोषाक उतरून धोतर–सदरा अशा घरच्या वेषांत तेथें येऊन बसले आणि कमाचा श्लोक 'आम्ही काय कुणाचें खातों रे' ऐकून बसतां बसतां म्हणालेही, "पोरी इतकी सेवा करून घेऊन 'आम्ही काय कुणाचें खातो रे! आहेच का पुन्हां!" पण त्यांचेंही लक्ष मग त्या देखाव्याकडे लागलें.

कमाच्या गौरवर्णाला हिरवी साडी शोभून दिसत होती व गळयामध्यें पदरावरून घातलेला मोत्यांचा सर मांडीवर टेकला होता. कानांमध्यें लांबलचक कर्णभूषणें लोंबत होतीं. एक पाय व्यासपीठाखालीं सोडून, डाव्या बाजूच्या समईकडे, प्रकाशाजवळ अक्षर दिसावें अशा तऱ्हेनें कोन करून बसल्यामुळें नेहमीं एका बाजूला कललेली तिची मानेची ठेवण आतां दोषास्पद न वाटतां साहजिक वळविल्यासारखी वाटत होती व दृष्टीची तरलताही झांकली गेली होती.

कमानें पहिला अभंग म्हणून प्रवचनास सुरुवात केली:—

"देव आपली काळजी करीत असतो. वो परमात्मा जो है वो सब लोकोंकी फिकीर कर सका है. सब लोकोंकु रोटी खानेकूबी देता है. तेव्हां काय मागावें आपण !

" मागणें लई नाहीं बा लई नाहीं;
पोटापुरतें देई "

आपल्याला फक्त दूधभात हवा तेवढा दिला रामानें म्हणजे झालें,

' जेथे जातों तेथें तूं माझा सांगाती।
चालवीसि हातीं धरुनीया ॥ '

आपण चालावें. जब कोई पडता है तो रामराया हात धरनेको आता है "

इतके अभंग व त्यांचा अर्थ हिला कळला तरी कसा असे उद्गार सर्वांचे तोंडून बाहेर पडले व अनाहूतपणें टाळ्या वाजल्या. आईसाहेबांनीं व आत्याबाईंनीं माल पदरानें डोळे पुसले. नानानें पुन्हां शिटी वाजवून पडदा पुढें ओढत आणला व प्रवचन संपलें असें जाहीर करण्यांत आलें. " अरे पण बुवांना आम्हांला भेटायचें आहे कीं ! " एक श्रोता म्हणाला.

बुवा पोषाक बदलून आपल्याबरोबर चहा घेण्याला येत आहेत असें सांगण्यांत आलें व दहा मिनिटांनीं मंडळी चहा घेण्यास जमली होती तेथें कमासाहेबांची स्वारी एक परकर व पोलका घालून व सरू मोलकरणीचा हात धरून हळूहळू पावलें टाकीत आली.

" या बुवा ! या बुवा ! " म्हणून तिच्या काकांनीं तिला आपल्याशेजारीं बसवून घेतलें व ते म्हणाले, काय कमासाहेब ! हें काय तुमचें नाटक कीं कथा कीं प्रवचन ? "

कमा मोठ्यानें हसूं लागली व हात हालवीत टाळ्या पिटून म्हणाली, 'मला सारं बाबानं सांगितलं ! '

" प्रथम आम्ही तिला अभंग म्हणावयास सांगणार होतों." बाबा म्हणाला, " पण तिला सर्वांच्या समोर चालत आणावें लागलें असतें. साडी तर तिला आवरत नव्हती. पडदा पुढें लावून नाटकाचें रूप दिल्यानें तिला साडी नेसवून आधींच व्यासपीठावर बसवून पडदा उघडल्यानें तिची चाल दिसली नाहीं. शिवाय मान सहज कलती झाली आहे असें दिसावें अशी बैठक तिची करतां आली. पाठीमागच्या देखाव्यामुळें यामध्यें भर पडली इतकेंच."

कमा हें आप्पासाहेबांचें सर्वांत धाकटें अपत्य. नकटें व्हावें पण धाकटें होऊं नये म्हणतात; पण ती धाकटीही होती व थोडीशी नकटीही होती. नाक साधारण असलें तरी गौरवर्ण, मोठें कपाळ व टपोरे डोळे यांमुळें तिची

देखण्या माणसांत जमा होण्यास मुळींच हरकत नव्हती. बारशाच्या वेळीं तर सर्व म्हणालींच–ही मुलगी सर्व बहिणींत सुंदर होणार व सरळ वाढती तर होतीही. पण देवाची इच्छा वेगळीच दिसत होती! सुमारें सहा महिन्यांची असतांच आजारी पडून पक्षघातावर तें दुखणें गेलें. लहान वयांत आलेले असे झटके बरे होतात तेव्हां काळजी करण्याचें कारण नाहीं, मुलीची सर्व वाढ व व्यवहार व्यवस्थित होईल; फक्त जरा सर्व गोष्टी सावकाश होतील. मी प्रयत्नांची पराकाष्ठा करतों असें डॉक्टरनें सांगितलें. ज्योतिषानें सांगितलें कीं, हिला सोळा वर्षांपर्यंत ग्रहपीडा आहे, त्याचे पुढें ती इतकी खडखडीत बरी होईल कीं, पूर्वीं कधीं आजारी होती कीं नव्हती असें वाटावें. तिच्या सुदैवानें जरूर ते पैसे वडील खर्च करूं शकले. आई–आत्याबाईंनीं शुश्रूषेचे कष्ट काढले. डॉक्टरनें प्रयत्नांची शिकस्त केली व कमाताई बरी झाली, पण 'गड आला नि सिंह गेला' या न्यायानें! जीव बचावला, पण शरीर पंगु बनलें. प्रगति सावकाश होणार या विश्वासावर सर्व धीर धरून होतीं. पण सावकाश म्हणजे फारच सावकाश सर्व होऊं लागलें. पहिली पांचसहा वर्षें तान्ह्या मुलाप्रमाणें ती आडवीच होती. तिची वाढ त्यानंतर सुरू झाली व आतां चौदा वर्षांचे सुमारास ती घरभर चालूं लागली होती. इतकेंच नव्हे तर आज शेजारच्या घरीं चालत जाऊन ती मंडळींना कथेचें बोलावणेंही करून आली होती. कमा चालत येणें याचें सर्वांना नवल वाटून तिनें बोलावलेल्या घरांतील सर्व माणसें न चुकतां हजर झालीं व हें सर्व कमाचें काम हें कळल्यावर तिच्या सूचकतेचें सर्वांस आश्चर्य वाटलें. कमा चालूं लागली पण दोन पायांचा सारखा तोल रहात नसे. त्यामुळें एक पाय ती ओढून टाकी. तसेंच डोकें तोलून धरण्याची शक्ति मानेंत आली तरी कलती मान ठेवायची लकब लागली ती कायमची. त्यामुळें तिचें पाहणें एकीकडे व बोलणें एकीकडे असें भासे. बसूं उठूं लागल्यावर खेळ जमवून स्वतःचा जीव ती रंजवीत असे. खेळांतील कपाटें व खुर्च्या ठेवून मांडलेला ऑफिसचा खेळ तिचा आवडीचा होता. कागद पेन्सिली संभाळण्याचा नाद, कागद घेऊन त्याचे तुकडे तुकडे करावयाच्या नादांत ती तास तास बसे; नव्हे रोजचा तो तिचा ठरीव कार्यक्रमच होता. पण तेच कागद घेऊन वाचावयास शिकवून पाहिलें, पण त्या वेळीं तें तिला जमेना. (आतां ती वाचते व लिहितेदेखील.) स्मरणशक्ति तिची चांगली. उषा, कुंदा, सरू मोलकरीण गोष्टी सांगत त्या तिला पाठ येत. तिची बैठक

ओसरीवरील एका दालनांत असे. म्हातारा चिकटे शिपाई सारखा तिजजवळ बसे, गोष्टी सांगे व अभंगही म्हणे. त्याच्यामुळें तिला भक्तिविजयांतील पुष्कळ गोष्टी व तुकारामाचे अभंग पाठ येत व रोज रात्रीं तास अर्धा तास ती स्वतः-शींच भजन करीत बसे. ओसरीवर अनेक शिपाई माणसें येत; ती हिंदी बोलत, तसेंच तिची लीलावहिनी तिच्याशीं हिंदी बोले. त्यामुळें तिला बरेंच हिंदी समजे व थोडेंसें तोडकेंमोडकें बोलतांही येई. जसजसे जास्त दिवस जात तसतसे बाकीची मंडळी हिंडतात-फिरतात, आगगाडींत बसून परगांवीं जातात, पण आपणांस नेत नाहींत हें लक्षांत येऊन ती हट्ट करूं लागली. पण चिकटे सांगतो, 'कमासाहेब पुढच्या वर्षी तुम्ही चालूं लागलांत म्हणजे आपण दोघं पंढरपूरच्या विठोबाला जाऊं व त्याला सोन्याचे पाय वाहूं. मग इतर कुणाला न्यायचें नाहीं बरं का!"

तिला हें पटतें. एक वर्ष केव्हां संपतें अगर किती मोठें असतें याची तिला कल्पना नाहीं व ती सर्वांना सांगते, "जा तुम्ही आतां. तुकाराम आणि मी पुढच्या वर्षी पंढरपुरास जाऊं."

इतर बाबतींतील तिची आकलनशक्ति बरीच वाढली आहे. घरांत कोठें काय चालतें तें सर्व तिच्या कानाला ऐकूं येतें व दुपारीं जेवतांना अप्पासाहे-बांना सर्व गोष्टींची माहिती ती न चुकतां पुरविते. कोणतीही गोष्ट तिला विचारून केली म्हणजे तिला आपण कोणी तरी मोठे आहोंत असें वाटतें व म्हणून तिला आनंद मिळावा या इच्छेनें घरांतील सर्व मंडळी प्रत्येक गोष्ट तिला मोठेपणा देऊन विचारून करतात.

आतां चौदाव्या वर्षाचे सुमारास ती चालू लागली आहे. घरभर हिंडते इतकेंच नव्हे तर शेजारीपाजारींही जाऊन निरोप सांगून येते. एवढ्या बाबतींत ती आतां स्वावलंबी होऊन स्वतःचे पायांवर उभी राहिली खरी. याच सुमारास अप्पासाहेबांचा सत्तरावा वाढदिवस येत होता. सर्व मुलांनीं जमून वाढदिवस साजरा करण्याचें ठरविलें व आप्तेष्टांना पत्रें लिहून आमंत्रणें केलीं. वाढदिवस होण्याचे पूर्वी घरांत महिनाभर मुलांचे बेत चालत, पण ते सर्व कमासाहेबांच्या पलंगाजवळ बसून. कमासाहेबांना मुळीं त्यांनीं आपल्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्षच करून टाकलें होतें. आज संध्याकाळीं सभेंत काय ठरलें हें ती दुसऱ्या दिवशीं सभेच्या वेळीं बिनचूक सांगे. तसेंच आज

काय काम करावयाचें होतें, कुणाला पत्र लिहायचें होतें तें लिहिलें कीं नाहीं याचीही चौकशी करी. शेवटपर्यंत अप्पासाहेबांना कळूं द्यायचें नाहीं ही गोष्ट सर्वांनीं मोठ्या मिनतवारीनें तिच्याजवळून कबूल करून घेतली होती व तिनें पाळलीही. फक्त रोज जेवावयास बसली म्हणजे म्हणे, " अप्पासाहेब आमची एक गंमत आहे पण तुम्हांला सांगायची नाहीं."

" अग पोरी सांग ग ! " आप्पासाहेब मुद्दामच लहान मुलाच्या आर्जवी-पणानें विचारीत.

" छे ! छे " कमा गंभीर चेहरा करून म्हणे, " तुमच्या वाढदिवसापर्यंत कांहीं सांगायचं नाहीं."

" मलासुद्धां तोंपर्यंत कांहींच कळणार नाहीं " अप्पासाहेब म्हणत. 'जेवतां धड येत नाहीं. हातांतला घास नीट तोंडांत जात नाहीं आणि म्हणे सभा करते.' पण सभेंत ठरणाऱ्या गोष्टी बिनचूक होतात कीं नाहीं याकडे तिचें लक्ष होतें. वाढदिवसाचे वेळी दारांत रांगोळी होती, पण ठरलेला श्लोक लिहा-वयाचा राहिला होतासें तिला दिसलें. तिनें तो बाबाकडून लिहवून घेतला. सर्व समारंभांत कमाकडे उठून दिसेल असें काम काय द्यावें हा सगळ्या बहीणभावंडांना प्रश्न पडला. इतर हालचालींचीं कामें देणें शक्य नाहीं व कांहीं दिलें नाहीं तर तिला तें जाणवणार. तेव्हां तिची हौस पुरी व्हावी म्हणून तर सर्वांनीं तिच्या आटोक्यांतील या प्रवचनाचा घाट घातला होता.

वाढदिवससमारंभ संपला. पाहुणे मंडळी गेली व मग विश्रांतीच्या वेळीं वाढदिवसाची कल्पना कशी निघाली, कोणीं काय सुचविलें याची चर्चा सुरू झाली. आप्पासाहेब, आईसाहेब, आत्याबाई आदि सर्व मंडळी सायंकाळीं अंगणांत बसली होती. एकएक जण आपली कामगिरी सांगत होता. " रांगोळ्या व चित्रें यांचें काम बाबानें फारच चांगलें केलें ! " नाना सांगत होता. " आणि कमासाहेब तर काय अध्यक्ष. तेव्हां सर्व श्रेय त्यांनाच."

" मी सांगू का आप्पासाहेब ? " कमा पुढें येऊन आप्पासाहेबांचे गळ्यांत हात घालून म्हणाली, ' बाबा रांगोळींतला श्लोक विसरला होता हो. पण मींच त्याला सांगितलं ' शरीरमाद्यं...' लिही कीं.

" होय बाई ! तुलाच 'शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्'चें महत्त्व कळणार. आप्पासाहेब तोंडानें म्हणाले, पण अर्धें वाक्य सोडून एकदम उठून बाहेर

गेले. आपला सत्तरावा वाढदिवस होण्याइतकें आयुरारोग्य आपणांस परमेश्वरानें द्यावें; पण आपल्या एका अपत्याला आरोग्य इतकें थोडें मिळावें कीं, आयुष्य कसें जाणार हा प्रश्न पडावा यांतील विरोध त्यांना फारच जाणवला. तिची नेहमींची हसरी मुद्रा पाहून इतरांप्रमाणें तेही म्हणत, " ठीक आहे. पंगु असली तरी आनंदी आहे." पण या वेळीं मात्र या हसऱ्या निर्माल्याकडे पाहून त्यांनीं अश्रूच ढाळले.

---

## पारूबाई : : : ८

सरलं दळण, सरलं म्हणूं नये।
माझ्या काकीबाईचं, नांदतं घर सये ॥ १ ॥
दळिलं दळण, सुपांत भरावं
उरलं माझं औक्ष। काकीबाई तुला जावं ॥ २ ॥

पहांटेचे चार वाजले होते व काकी जिना उतरून खालीं येत होत्या. जिन्यांत आल्याबरोबर सोप्यावरील जात्याची घरघर कानीं पडली आणि त्यांच्या मनांत आलं कीं, पारूबाईला चांगलं रागवावं कीं, " बाई ग! आजसुद्धां तुला दळल्याखेरीज रहावत नाहीं ना!" पण तिच्या ओंव्या कानीं पडल्या, तसा रागावण्याचा विचार मनांतच राहिला व त्या मुकाट्यानें माजघरांत शिरल्या. तात्या आधींच खालीं उठून आले होते व नित्याच्या पद्धतीप्रमाणें किटलींत चहा ओतीत होते. तात्यांनीं आपला व काकींचा चहा गाळून घेतला व हाक मारली, 'पारू' पारूबाईनें आपलें भांडें पुढें ठेवलें. तात्यांनीं त्यांत चहा ओतला व हसत हसत म्हटलें, " पारू, आज तूं दळलंस, पण उद्यां आमची आम्हांलाच सोय लावली पाहिजे ना!" पारूबाई किंचित् हसल्याचा भास झाला; पण भासच तो. मुकाट्यानें भांडें घेऊन पारूबाई सोप्यावर आली व स्वतःशींच म्हणाली, " आपलं आहे तंवर करावं होईल तें. उद्यां मी कुठं तें पाहायला आलें, काय व्हणार तें!

आणि असेंच तिचें बोलणें. आज तीस वर्षें होऊन गेलीं, पारू या घरांत

काम करीत होती. तात्या-काकी यांच्या संसारांत तिची अविस्मरणीय कामगिरी झाली होती. पण त्या कामगिरींत शब्दांचें काम फारच थोडें होतें. एका वेळेला दोन वाक्यांपेक्षां जास्त बोलतांना तिला फारच थोड्या लोकांनीं ऐकलें असेल पण पारूबाईचा घरांत होत असलेला वावर मात्र सर्वांच्या अनुभवास येत होता. घरांत ती आली ती भांडीं घासावयास मोलकरीण म्हणून. तात्यांनीं सातारला आपला दवाखाना नुकताच सुरू केलेला. काकींचीं मुलंबाळं लहान. बाईमाणसाची गरज भासावयाचीच. शेजारच्या बाईंनीं कामाला बाई म्हणून दाखवून दिली. शिवाय वर सांगितलें कीं, तुम्ही अडचणच आहे म्हणतां म्हणून मी हिचं नांव सांगते; पण पाटाची बाई आहे हो ती! तिचीं दोन मुलं पहिल्या घरचीं; लहान आहेत तीं तीन या घरचीं. पहिल्या मुलीचं लग्न होऊन जांवईसुद्धां आला आणि मग बाईनं पाट लावला हो! त्यांच्या जातींतसुद्धां तिला कमी लेखतात; पण तुमचीं आज फार अडचण आहे म्हणून दाखवून दिली झालें."

असेना का?" काकी म्हणाल्या होत्या. "मला काय तिच्या हातचं जेवायचं आहे थोडंच. कोरडं काम करील झालें. मग दुसरी चांगली मिळाली म्हणजे हिला नको म्हणून सांगेन."

पण योग असा होता कीं, ती त्यांच्या घरांतून जावयाची नव्हती. महिना दोन महिने दुसरी बाई मिळाली नाहीं व तेवढ्या वेळांत पारूच्या कामकाजाची रीत काकींना इतकी आवडली कीं, त्यांचा पुढे दुसरी बाई पाहावयाचा विचारच मागें पडला. आल्यापासून खालच्या मानेनें ती जी कामाला सुरुवात करी तीं जाईपर्यंत. कामाला स्वच्छ व वर अबोल असें मनुष्य सहजासहजीं कोण जाऊं देईल! पण जास्त परिचयानें तिच्या वर्तनांतला घरंदाजपणा, मनाचा मोठेपणा, एकेक प्रत्ययास येऊं लागला. घरीं मुलें लहान; कामाला आलेल्या घरांत खाण्यापिण्याचे जिन्नस डोळ्यांसमोर दिसत, पण कधीं जिन्नस तिनें उचलला नाहीं कीं हांवऱ्यासारखा मागितला नाहीं. तुम्ही द्याल त्यांत संतोष. काकींचीं मुलेंबाळें आजारी पडलीं कीं न बोलावतां जाग्रणास तयार. हळूहळू पारू, तिचा नवरा व मुलें काकींना आप्तस्वकीयांप्रमाणें वाटूं लागलीं. पहिला प्लेग आला. तात्यांनीं आपल्या झोपड्या गांवाबाहेर बांधल्या त्या वेळीं जवळच एक लहान खोपटं उभारून पारूचे कुटुंबाचीही सोय केली. पण पारूचें नशीब उलटलें होतें. सोन्यासारखीं मुलेबाळें पहिल्या प्लेगांत देवाघरीं गेलीं. पारू व तिचा

म्हातारा नवरा अशीं दोघेंच राहिलीं. आणखी चार वर्षांनंतरच्या प्लेगांत म्हाताराही आटोपला व पृथ्वीच्या पाठीवर पारू अनाथ एकाकी उरली. तिनें जोडलेलें काकींचें घर तेवढें तिला उरलें. मुलें गेल्यापासून ती काकींच्या मुलांबाळांतच जीव विसावे. एक म्हाताऱ्याचा पाश तोही पुढें तुटला. तेव्हां काकी म्हणाल्या होत्या, “पारू, कोणी नाहीं असें कां म्हणतेस? आम्ही सगळीं तुझींच आहों.”

* * *

काळ चाललाच होता. आणखी पंधरा वर्षें गेलीं. काकींच्या घरांत आतां सुना व नातवंडें आलीं. पहिल्या मोठ्या मुलांना पारूचा वेगळा संसार थोडा तरी माहीत; पण पुढच्या लहान मुलांना व सुनांना पारूबाई हें एक घरांतील माणूसच वाटे. त्यांना आठवे तसें ती याच घरांत जेवी व याच घराचे पडवींत झोप घेई. धाकट्या कांहीं नातवंडांना तर वाटे कीं, पारूला झोप घेण्याची जरूरच पडत नाहीं. काकींचा एक नातू आण्णा. त्याचे शाळेंत एकदां मास्तर सांगत होते कीं, गाय बसून झोपते, म्हैस बसून झोपते, पण घोडा मात्र बसत नाहीं इ. त्या वेळीं मास्तर म्हणाले, “आणखी असे कोणी प्राणी आहेत का, कीं ज्यांना बसून झोप येत नाहीं?” अण्णानें उठून सांगितलें कीं, “मास्तर आमच्या घरची पारूबाई अशीच आहे. तिला तर झोपच घ्यावी लागत नाहीं.” कारण जेव्हां तो निजून उठे तेव्हां पारूबाई काम करीत असे; पुन्हा रात्रीं तो निजायच्या वेळेला त्याच्या अंथरुणाजवळ बसून गोष्टी सांगत असे. पहाटे कधीं उठला तर ती दळतांना त्याला मांडीवर निजवून आणखी ओव्या म्हणत असे.

स्वच्छता व टापटीप याबद्दल तात्या-काकींच्या घराची प्रसिद्धि जशी होती तशीच तात्यांच्या रागीट व करारीपणाचीही प्रसिद्धि होती. मोलकरणी-गड्यांपासून काकींच्यापर्यंत कोणाच्याकडून घडलेला थोडासुद्धां हलगर्जीपणा त्यांना कधीं खपला नाहीं. “A place for everything and everything in its place.” हें त्यांचें आवडतें तत्त्व असून तें ते कसोशीनें अमलांत आणीत. त्यामुळें त्यांचे मित्र नाना केळकर म्हणतच कीं, “डॉक्टर, तुमच्या हाताखालीं जें मनुष्य पास तें त्रिभुवनांत पास.” आणि या परीक्षेत पारूबाई पास होती. भांडीं लखलखीत ठेवण्याबद्दल त्यांचा कटाक्ष आणि पारूबाई

तशीं तीं ठेवी. नाना आले कीं प्रथम प्यावयास पाणी मागत व म्हणत, " तुमच्या घरीं आलें म्हणजे तहान नसली तरी पाणी प्यावेंसें वाटतें."

मालक उठावयाच्या आंत पारूबाईचे केरवारे होत, आंघोळीचें पाणी तयार असे, तोंड धुवावयास तपेलीभर पाणी व पाट मांडलेला व वर तोंड पुसावयाच्या रुमालाची त्यावर घडी इ. सर्व तयार; पण ही तयारी करणारी व्यक्ति मात्र समोर दिसावयाची नाहीं. जणुं या गोष्टी रात्रीं आपोआप निर्माण होत. एकाद दिवशीं पारूबाई कोठें परगांवीं गेली असेल तर तात्या लागलीच काकींना विचारीत, " आज पारूला कुठें पाठविलीत ? "

" कशावरून ? " काकी विचारीत. " आंघोळीची तयारी नीट आहे ना ! "

" रुमालाची घडी बदलली आहे, पारूच्या हातची नव्हे." आणि असें तिचें अस्तित्व प्रत्येक ठिकाणीं जाणवें.

जी स्वच्छता कामांत तीच स्वतःच्या बाबतींत. भांडीं घाशील, मोऱ्या धुईल सर्व करील, पण एकदां का दुपारीं अंग धुऊन स्वच्छ लुगडें नेसली कीं पहातांच वाटावें, ही मोलकरीण कशी ? ही तर पांढरपेशांत मोडते. आज जरी वयानें ती उतरल्यासारखी व काळवंडल्यासारखी वाटली तरी एक वेळचा तिचा गौरवर्ण ओळखूं येई व गाल खोल गेल्यानें नाक जास्तच तरतरीत सरळ दिसे. हातांत चांदीचे गोठ, गळयांत वज्रटीक व पुतळयांचें गांठलें घालून जेव्हां ती जेवावयास बसे तेव्हां तिचें रूप जास्तच उजळल्यासारखें वाटे.

काकींचा एक गुण म्हणजे गडी-माणसांना वाढल्याखेरीज त्या कधीं जेवत नसत. घरांतील मुख्य पंगत झाली कीं त्या पारूबाईला वाढून देत व मग आपलें देवदेवतार्चन राहिलें असेल तें उरकीत आणि स्वयंपाकाच्या बाईसह जेवावयास बसत. पारूबाई दिलेले पान झांकून ठेवी व तिचें किरकोळ काम करावयास लागे. तात्या माडीवर जातां जातां म्हणत 'अग पारू, तें अन्न कां निवंवतेस ? पण पारूबाईचें काम चालूच राही. शेवटीं काकी स्वयंपाकघरांत जेवावयास बसलेल्या कळलें कीं पारू ताटावरचें झांकण काढी व जेवूं लागे. कुणी सासुरवाशिणी माहेरवाशिणी तिला लवकर जेवण्याचा आग्रह करूं लागल्या तर हळूच म्हणे, 'असं कसं वं ! काकींच्या जिवासाठीं आम्ही; ते त्यांच्या आधीं कसं जेवावं बा ! "

* * *

अलीकडे दहाबारा वर्षे वरकामाला दुसरी बाई ठेवली होती व कोठी संभाळणें इ. कामें पारूबाईकडे आलीं होतीं. एक प्रकारें बढतीच झाली होती तिला. पण त्याचा तिनें कधीं दुरुपयोग केला नाहीं कीं दुसऱ्या गडीमाणसांना कधीं टाकून बोलून पाटिलकी गाजविली नाहीं. वरकाम करणाऱ्या रखमाईला, तसेंच स्वयंपाकाच्या मैनाबाईला थोडें वैषम्य वाटे. त्या बोलूनही दाखवीत. "पारू! पारू! सगळ्यांनीं करून फुलावाणी फुलविया जणु! आम्ही काय काम करीत नाहीं." पण विश्वास असा मागून का मिळत असतो!

तिची वागणूक पाहिली म्हणजे वाटे कीं, हिचें कांहीं जीवनविषयक तत्त्वज्ञान आहे का? कोणत्या विचाराच्या जोरावर ही शांतता व कर्तव्यनिष्ठता हिच्या ठिकाणीं बाणली आहे? तात्या स्वतः भक्तिमार्गाचे अनुयायी. रोज भजनाचा कार्यक्रम सकाळ-संध्याकाळ चालावयाचा व घरांतील मंडळी, तसेंच पेठेंतील मंडळीही भजनास येत. घरांतील गडी, कांपाउंडर या सर्वांना तात्यांनीं भजनांत सामील करून घेतलें होतें. कोणी साथ करी तर कोणी तबला वाजवी. मैनाबाई, कृष्णाबाई, भिमाबाई इ. घरांतील आश्रित बायकाही भजनास बसत, अभंग म्हणत व त्यांत समरस होत. आपणाला भजनांतील अभंगांचा अर्थ कळतो याबद्दल त्यांना सहज आनंद वाटे. दुपारीं सोप्यावर स्त्रीपार्लमेंट भरलें म्हणजे कृष्णाबाई अभंग म्हणत व त्यांचें विवरण करून इतरांना सांगत.

"निंदकाचें घर, जशी साबुणाची वडी,"
"मन ही पासोडी, शुद्ध केली ॥"

"आपल्याला लोकांनीं नांवें ठेवलीं तरी रागावूं नये, त्याचा विचार करावा व साबणानें जशी पासोडी स्वच्छ होते तसें आपलें मन शुद्ध करावें." परंतु प्रवचन करणें वेगळें व तें हृदयांत ठसणें वेगळें! या वेळीं कोणीं म्हटलें, 'कृष्णाबाई, उठा आतां गप्पा पुरेत; भाजी चिरायला घ्या' कीं लागलीच त्यांचा राग उसळून येई व त्याच अभंगवाणीनें उत्तरत,

"राग आला तरी, कापा माझी माण।
परि अपमाण, करूं नका."

पारूबाई रात्रीचे भजनास बसलेली कधीं दिसत नसे. काम संपलें म्हणजे सोप्यावर आपल्या पोत्यावर पडून राही व आरती होऊन मंडळी घरोघर

गेली कीं दारें बंद करावयास उठून उभी राही, मग सर्व दिवसाच्या श्रमामुळें झोप घेई कीं अभंग ऐकून त्यावर विचार करी तें तिचें तिलाच माहीत. पण–

" पक्षी आंगणासी आला,
चारा चरोनियां गेला ।
तैसे असावें संसारीं,
जोंवरी प्राचीनाची दोरी ॥

अशी तिची वागणूक वाटे खरी.

वरकाम करणारी, स्वयंपाक करणारी मैनाबाई व पारूबाई दोघीही पगार घेऊन परत काकींच्या जवळच ठेवावयास देत; त्या काळचा पगार तो किती. महिना पांच म्हणजे फार! बारा वर्षांचा पगार सांचवून मैनाबाईनें आपले आईच्या वेळचा गहाण पडलेला शेताचा तुकडा सोडविला. कांकींनीं रुपये आणविले व दोघींचा पगार दोन ताम्हनें भरून प्रत्येकीच्या पुढें ठेवला. ताम्हनभर रुपये पाहून 'इतके माझे पैसे' म्हणून मैनाबाई सारखी वेड्यासारखी हसूं लागली व शेवटीं तिला दोन दिवस कोंडून ठेवावें लागलें. पारूबाई-पुढेंही काकींनीं पैशाचें ताम्हन ठेवलें. पण तिनें त्याच्याकडे धड पाहिलेंही नाहीं. 'अन् आतां हें घ्यून कुठं जाऊं जी! ठिवा की तुमच्यापाशीं' इतकेंच हळु जणुं स्वतःशींच म्हणाली. काकींनींच आग्रहानें तिच्या पैशांपैकीं थोडे खर्चून गाठलें व वज्रटीक तिला करून दिली.

*　　*　　*

या गोष्टीलाही दहा वर्षें होऊन गेलीं होतीं. चाळिशीच्या सुमारास ती या घरांत कामाला आली. आतां तिची सत्तरी उलटली! हळूहळू थकवा येणारच. याच वेळीं तिची कोकणांत दिलेली थोरली मुलगी सातारला आली; तिनें आग्रह केला, 'आई, असे काय तुझे दिवस उरले आहेत, चल माझ्या घरीं.' आणि सर्वांचे विचारें पारूबाईचा जाण्याचा दिवस ठरला. पारूबाई जाणार हें सर्वांनाच कठीण वाटूं लागलें. घरांतल्या सर्व नातवंडांत छोट्या पंडितचा तिच्यावर फार जीव. ती जेंवावयास बसली कीं तो समोर येऊन बसे व विचारी, तुला भाकी हवी? भाजी हवी? आणि एकदा तर काकी जेवत असतां त्यांना शिवून त्यांचे पानांतील भाकरी त्यानें पारूबाईला वाढण्यास उचलली.

काकी म्हणत, "अरे, तुझ्याखेरीज कुणी तिच्या काळजीचें नाहींच का रे?" पण कोणताही जिन्नस, पेपरमिटाची वडीसुद्धां प्रथम आणून तिच्या तोंडांत कोंबल्याखेरीज तो रहात नसे. पारूबाई जाण्याचें ठरतांच आपले दोन सदरे त्यानें गुंडाळून तिच्या गाठोड्यांत घालावयास दिले व म्हटलें, "मी तुझ्या-बरोबर येणार हं." रात्रीं पारूबाई गोष्टी सांगावयास त्याच्या बिछान्याजवळ बसली व शेवटीं कुरवाळून म्हणाली, "सोन्याचा घांस घातलास बरं माझ्या राजा; हा घे तुला माझा खाऊ. आणि आपल्या गाठल्यांतली एक सोन्याची पुतळी तिनें त्याचे हातीं दिली.

धाकट्या वहिनींच्या वसंताला तिनें पहाटे मांडीवर घेतलें व म्हटलें, "वैनी, सांभाळ हं त्याला. माझं मूल लई अवखळ. त्याचा बाप बी असाच. त्याला आवरतांना काकींना अन् मला पुरं पुरं झालं बघा!"

शेवटीं जाण्याची वेळ झाली. तिची मुलगी व जांवई दारांत गाडी घेऊन आले. गांठोडें गाडींत पडले. तात्यांनीं आपलें भजन थोडा वेळ थांबविलें, पारूबाईचा नमस्कार घेतला व तिला निरोप दिला. तात्यांच्याप्रमाणेंच काकीं-च्याही पायाला हात लावून नमस्कार करावयास ती वांकली व म्हणाली, "काकी, तुमच्यामुळं माझं दीस निघालं बरं." काकी गहिंवरल्या व पारू-बाईस उठवून कडकडून भेटून म्हणाल्या, "पारूबाई, तुला चैन पडलं नाहीं तर परत ये बरं. घर तुझंच आहे."

गाडी चालू लागली. पारूबाई दूर जाऊं लागली. काकींच्या डोळ्यांचें पाणी खळेना. आज तीस वर्षें सावलीप्रमाणें त्यांच्या मागोमाग हिंडणारी पारूबाई आज त्यांना सोडून गेली.

* * *

दुपारीं स्त्रीपार्लमेंट नेहमींप्रमाणें सोप्यांत भरलें होतें. कृष्णाबाईचें प्रवचन सुरू होतें. विषय 'पारूबाई.' अशीं मनं माणसानं आपल्याकडे ओढून घ्यावीं लागतात बरं! इतकं काकींचं सोवळं-ओवळं पण तिला काकी शिवून कडकडून भेटल्या! पण, आम्ही उद्यां गेलों तर आमच्यासाठीं कुणाला इतकं वाटणार आहे. पण माझा आपला पडला मनमोकळा स्वभाव. राग आला कीं बोलावंसं वाटतं. पारूबाई मनांत ठेवी म्हणून तर ती सगळ्यांना हवी.

# कृष्णाबाई : : : ९

> " राग आला तरी, कापा माझी माण,
> परी अपमान, करूं नका। "

सकाळीं आठ-साडेआठ झाले असतील. वाचनांत मी अगदीं गुंगून गेलें होतें. सहामाही संपावयाची वेळ आलेली. अभ्यासक्रमाचा उरलेला भाग लवकर संपवावयाचा होता व शांकरभाष्यांतील परमतखंडनापर्यंत गाडी येऊन पोंचली होती. आधींच आचार्यांची वाणी जोरदार व एकदां परमतखंडनाला सुरवात झाली म्हणजे तर त्यांच्या जोरदार वाणीला फारच आवेश चढतो. जणुं कांहीं ' कुठें आतां दावो प्रखर नखलील मृगपती।' अशी स्थिति त्यांची होते. साहजिकच वाचणारांतही तो आवेश संचारतो. प्रथम शंका निर्माण करावी, मोठ्या कसोशीनें पूर्वपक्षमंडन करावें आणि श्रोत्याला ' अरे, हें सर्व खरें तर ' असें जरा वाटूं लागतें तोंच—जोरानें ' इति चेत् न ' असें म्हणून पहिल्या सर्व पूर्वपक्षावर पाणी ओतून परमतखंडनाला त्याहून आवेशानें सुरवात करावी. म्हणजे श्रोता पुन्हा घोटाळतो कीं, हें सर्व पटूं लागलें खरें, पण हें संपतांच पुन्हा आणखी आचार्य ' इति चेत् न ' वर येणार नाहींत ना! साहजिकच वाचनांत मी अगदीं गढून गेलें होतें व भोंवतालची गडबड मला कळतही नव्हती. पण माझ्या एकतानतेचा भंग होईल इतक्या मोठ्यानें कृष्णाबाईंची अभंगवाणी माझे कानावर आदळली. मागोमाग कांहीं क्षणांनीं दाणदिशीं दार उघडलें व कृष्णाबाई सदेह प्रविष्ट होऊन त्यांनीं शेजारच्या आरामखुर्चीवर अंग टाकून दिलें.

" का काय चाललं आहे कमळाबाई ? " हाशहुश् करीत व पदरानें वारा घेत त्या म्हणाल्या, " शेवटीं सांपडलं एकदांचं तुमचं घर! अहो, शोधतां शोधतां पुरे वाट. शेवटीं एकदांची एक मायबाई भेटली व दाखवलं तिनं. गुरुमाउलीची कृपा अशी असते बरं! म्हटलंच आहे ' जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती.'

" मग तुम्हांला कोण सांगाती भेटला ? " मी.

" अहो, भेटला असाच. दत्तांनीं चोवीस गुरु केले ते असेच ज्ञान मिळविण्यासाठींच नाहीं का ? तसाच मीं टांगेवाल्याला गुरु केला. मायबाईनें त्याला पत्ता सांगितला व सांगितलं कीं बाई पुण्यांत नवीन आहेत तेव्हां

त्यांना या पत्त्यावर पोंचवून ये. पैसे पोंचवून परत आल्यावर देईन. पण तुमचे पुण्याचे टांगेवाले काय विचारतां! मध्येंच म्हणाला, 'बाई दुसरी स्वारी मिळती आहे घेतों टांग्यांत' मीं साफ सांगितलं कीं, तें कांहीं चालायचं नाहीं. मीं सबंध टांगा ठरविला आहे. तूं राजा नि मी राणी. चल मला प्रथम ठरल्याजागीं पोंचव नि मग कुठें तो जा."

"अहो, हसायला काय झालं?" मला हसूं आलेलें पाहून त्या पुढें म्हणतात, "हसा बाई! आम्ही वेडगळ, तुमच्या पुण्यासारखी बोली आम्हाला कोठून येणार? त्यांतून तुम्ही शिकलेल्या; आणखी आतां तर काय इंग्लंडहून आलांत. हसा बाई!"

"अहो, पण तुम्ही आतां इथें कुठें? केव्हां आलांत? कुठें उतरला आहांत?" मीं प्रश्न विचारावयाची संधि साधून घेतली. कारण पुन्हा कृष्णाबाईंच्या वक्तृत्वाचा धबधबा सुरू झाला कीं मला बोलावयास अवसर सापडणार नाहीं हें पूर्वानुभवानें मला माहीत झालें होतें.

"अहो, कुठें म्हणजे काय? मी आतां अशीच हिंडणार आहे. ताईसाहेबांचं घर मीं सोडलं. झाले चार महिने. म्हटलं आतां जरा आयुष्याचं सार्थक करावं. पूर्वसुकृताची जोड बरं कमळाबाई. आमच्या गुरुदेव भेटल्या व त्यांचा उपदेश घेतला आणि आतां त्यांच्या सेवेसाठीं इथं आलें आहे. आहे एक माझी मायबहीण तिच्याकडे उतरलें. पण म्हटलं एकदां कमळाबाईंना भेटावं. अहो, भांडलं म्हणून काय झालं? ताईंची मैत्रीण म्हणजे मला तुम्ही ताईसारख्या. पहिलं सहवासाचं प्रेम असतं त्यामुळें भेटावंसं वाटतं."

"पण भांडलांत कुणाशीं? ताईंचा व तुमचा अगदीं एकजीव होता."

"अहो, ती एक कथा आहे." कृष्णाबाई उद्गारल्या, "कसं भांडण झालं कुणास माहीत! अहो, हे प्राक्तनाचे योग बरं. आतांपर्यंत आमचं कधीं भांडण झालं नव्हतं. तुम्हीं भांडणं ऐकलीं म्हणतां? अहो, भांडण नाहीं. म्हणजे काय बोलाचाली व्हायचीच. घरामध्यें भांड्याला भांडं लागायचंच! माझा स्वभाव किनी कमळाबाई, अगदीं मोकळा आहे. मनांत कांहीं रहायचं नाहीं. आला राग कीं भडभडून बाहेर पडतो. पुन्हा अपमान खपत नाहीं. जन्मापासून कधीं कामाकष्टाची सवय नाहीं. लहानपणीं आईनं कौतुक केलं एकटी मुलगी म्हणून. लग्न झाल्यावर काय चार वर्षे संसार केला. यजमानां-

नींही कौतुक केलं. बिजवराची बायको, पण येवढा शब्द खालीं पडूं दिला नाहीं. त्यामुळें शेवटीं संवय लागली झालं. मनाविरुद्ध झालेलं खपत नाहीं. काय करूं." कृष्णाबाईनीं जरा दम खाल्ला. मीं एकदां घड्याळाकडे पाहिलें.

"तसं मला कोणाकडे काम करण्याची जरूर नाहीं. पोटापुरतं ठेवलं आहे गरिबीनं राहिलें तर. पण कष्ट करण्याची संवय मोडली ना एकदां. शिवाय आई मरतांना म्हणाली होती, कृष्णे तूं एकटी, रूपवान्, तरणीताठी. कुणा-तरी कुटुंबवत्सल माणसाच्या घरीं रहा. म्हणजे तुझे दिवस चांगले जातील. मागून पांचसहा वर्षांनीं ती वारली आणि इतक्यांत तुमचे बापूसाहेब आमच्या गांवीं बदलून आले. मला साठ्यांच्या काकू म्हणाल्या, "तुला कुटुंबवत्सल घर हवं ना! ते सबजज्ज नवीन बदलून आले आहेत. त्यांच्या घरीं रहा. स्वयंपाक करावा लागेल. पण त्यांना मुख्य सोबत पाहिजे. थोरला मुलगा नुक-ताच वारला त्यांचा. त्यामुळें त्यांच्या पत्नी सदा दुःखी–कष्टी असतात. घरांत दुसरें मनुष्य असल्यास बाईंना जरा करमणूक होईल. वकिलीणबाईंनीं सांगि-तलं आमच्या कृष्णाबाईला पाठची बहीण समजा व ताईही मला तसेंच सम-जत बरं. त्या ताई व मी माई. अहो, कुणाला माहीत नव्हतं किती वर्षं कीं, मी स्वयंपाकाची बाई."

"हें तर सर्व मला माहीतच आहे!"

"तें तर खरंच कमळाबाई. तुम्हांला काय हें सर्व माहीत नाहीं? तुम्हांला काय पुन्हां सांगायचें. तरी पण असं असूनसुद्धां वेळ आली. नाहीं त्यांचं आमचं पटलं!" आजपर्यंत कितीदां तरी भांडणापर्यंत वेळ आली होती. कांहीं कारण झालें कीं मला कांहीं गप्प राहावायचं नाहीं. मी सगळ्यांना गडीमाणसांपासून बोलायची. ती माउली कधीं बोलली नाहीं बरं! फार तर म्हणायची, कृष्णाबाई किती बोलतां हो! पण हीच वेळ कशी आली. मी दर वेळीं म्हणायची, नाहीं तुमचं माझं पटत—ही मी चाललें निघून आपल्या गांवाला. दर वेळीं त्या थांबवून घेत. गड्यांना सांगत, त्यांना कांहीं टांगा आणून देऊं नकोस. पण या वेळेला काय झालं कुणास माहीत! मी जातें म्हणतांच 'चालत्या व्हा' म्हणाल्या. माझंही डोकं भडकलं. शेजारच्या घरीं जाऊन राहिलें. मीं सांगून टाकलं सगळ्यांना; बहीण नाहीं न् कांहीं नाहीं मीं ताईची. मी त्यांच्या घरची स्वयंपाकाची बाई आहें. सगळीं म्हणत, 'मावशी-बाई, मावशीबाई.' करायचा काय खोटा मोठेपणा. आमची कुसुम. ती पोर

मला मावशी म्हणे. त्या मला माई म्हणत. इतक्या माणाणं राहिलं ती काय अपमाण करून घेऊन राहूं!"

"म्हणजे हें ठीक! तुमचा स्वभाव रागीट, तापट त्यांत कधीं बदल व्हायचा नाहीं. मग ताईंना एकदां सुद्धां का राग येऊं नये? रोज तुमची कटकट. मनुष्य एकाद वेळ कंटाळायचेंच."

"पण ताईंनीं वकिलीणबाईंना सांगितलं नव्हतं का, कीं आमच्या कृष्णाबाईला संभाळून घ्या व त्या होय म्हणाल्या होत्या."

"होय. तेवढें त्यांचें चुकलें खरें." मी जरा रागानें म्हटलें, "आणि काय हो, दुसऱ्याच्या घरीं कामाला रहायचें म्हणजे आपण गरिबीनें रहावें लागतें तें कांहीं साम्यांच्या काकूंनीं तुम्हांला सांगितलें नव्हतें ना! जें कांहीं सांगितलें तें ताईंना!" —

"पण ताईंनीं इतके दिवस नाहीं का मला संभाळून घेतलं, तसं या वेळींही घ्यायला हवं होतं!"

"चुकणें भूषण आम्हां, भूषण करणें क्षमा तुम्हां देवा" असं नाहीं का? आमच्या गुरुदेवांच्या प्रवचनांत हाच अभंग काल आला होता. रामदासांचा आहे हा!"

"स्वतःच्या स्वभावाची आणखी संगीन तरफदारी करा!" मीं जरा रागावूनच म्हटलं. "अहो, धाकट्या बहिणीसारखं वागवीन, संभाळून घेईन असं म्हटलं हा काय गुन्हा केला कीं काय? नाहीं तर स्वयंपाकाच्या बाईला इतकं संभाळायचं कोण कबूल करतं. त्यांनीं जसा तो विचार केला तसा तुम्हीं नको होता का करायला, कीं त्यांनीं बहीण म्हटलें तरी आपण आपली पायरी समजून वागायचं. त्यांच्या घरांत येणाऱ्या प्रत्येक माणसाशीं व नातेवाइकाशीं तुमचं पटेनासं झालं तर त्यांनीं काय तुम्हांला संभाळण्यासाठीं बाकीचीं सारीं माणसं सोडायचीं."

"पाहिलं! रागावलांत!" कृष्णाबाई जरा नरमून म्हणाल्या, "शेवटीं तुम्हांला तुमच्या मैत्रिणीचंच खरं वाटायचं. आम्हांला कुठले इतके छक्केपंजे. लोकांच्या लबाड्या आम्हांला येत नाहींत. त्यांनीं बहीण म्हटलं तरी आपण परक्यासारखं वागायचं. माझा स्वभाव आपला सरळ बरं. जसं मनांत तसं जनांत."

"बरं तें जाऊं दे कमळाबाई" त्या पुढें म्हणाल्या.

" आणखी किनी कमळाबाई, तुमच्या बापूसाहेबांनीं यांत कशाला लक्ष घातलें? नेहमीं ते कधीं बोलत नसत." कृष्णाबाई पुढें म्हणाल्या, " मी मोठ्यानें बोलूं लागलें कीं मुकाट्यानं मधलं दार बंद करून घेत, म्हणजे आम्हीं समजावं कीं, यांना कामांत त्रास होतो आहे. अतिशय शांत, अगदीं धर्मराज बरं. एकाद दिवशीं मी गप्प असलें म्हणजे जेवतांना कुसुमला म्हणायचे, आज तुमचे 'फुकट फौजदार' कुठं गेले आहेत सकाळपासून? ड्रम कुठें वाजला नाहीं तो!' पण त्यांनींसुद्धां या वेळीं कठोरपणा केला. या वेळीं मी जातें म्हणतांच त्यांनीं गड्याला सांगितलं कीं, यांना टांगा आणून दे व तिकीट काढून दे. एकदांसुद्धां कांहीं राहा म्हणाले नाहींत. अगदीं रामासारखे एकवचनी बघा. मीं गांवीं जाऊन पत्र लिहिलं मला परत यावंसं वाटतं म्हणून. पण उत्तर नाहीं. शब्द अगदीं रामबाणच किनी! एकदां तोंडून बाहेर पडला कीं बदलायचा नाहीं. जाऊं दे, ते तर कांहीं बदलत नाहींत आतां. मीं म्हटलं आपला स्वभाव हा असा, तेव्हां जमल्यास सत्संग करावा व बघावा स्वभाव बदलतो का? पण तुम्हांला वेळ आहे ना! नाहीं तर मला आपली बोलायची संवय..."

" हं. आहे कीं " मीं म्हटलें. एर्वीतेर्वीं वेळ गेलाच होता. घड्याळाकडे पाहण्याचा विचार बदलून हातांतील शांकरभाष्य मीं टेबलावर मघाशींच मिटून ठेवलें होतें. " मला आज कॉलेज नाहीं, तेव्हां गडबड नाहींच."

एव्हांना कृष्णाबाई आरामखुर्चीवरून उठून खिडकीपाशीं आल्या होत्या. आळस झाडून एकदां बाहेरचीं झाडें वगैरे पाहून मग त्या फोटो पाहूं लागल्या.

" काय कमळाबाई! तुम्ही आपल्या रागवा, पण मला ताईचीं माणसें आपलीं वाटतात. कमळाबाई, मी जर लहाणपणापासून शिकलें असतें तर मीसुद्धां तुमच्यासारखीच प्रोफेसर झालें असतें. अगदीं बोटींतूनसुद्धां जाऊन आलें असतें. तसा माझा स्वभाव भित्रा नाहीं बरं का. लहानपणीं आम्ही चिंचवडच्या जत्रेला एकट्या दोघी दहा मैल चालत गेलों होतों. आणि हे फोटो कुणाचे हो? हा दाढीवाला बुवा कोण?

" तो होय? ते माझे प्रागचे प्रोफेसर विंटरनिट्झ."

" आणि हा दुसरा दाढीवाला बुवा? अहो, हा आपल्याकडला दिसतो, साहेब नव्हे!" फोटो हातांत घेऊन बारकाईनें पाहून पुन्हा पुन्हा त्या म्हणतात, 'अहो ओळखलं, तुमचे ते कर्वे म्हणतात तेच नाहीं का हे! वर्ध्याला

आमच्या घरीं उतरले होते. पण दाढी नव्हती बरं का तेव्हां. कांहीं त्रास नव्हता त्यांचा. आवड नाहीं नि निवड नाहीं. येवढे मोठे म्हणतात, पण पानावर बसले कीं दोन पोळ्या घेत. मीच वाढीत असें त्यांना."

"पण काय हो, विचारूं का एक तुम्हांला?" त्यांचा वाक्प्रवाह पुढें चालू झाला. "हे कर्वे स्त्रियांची उन्नति करतात म्हणे. सांगा आतां, माझ्यासारखीला ते काय मदत करतील? शिकण्याचं आतां का माझं वय आहे? तुमचं असं झालं तेव्हां तुम्ही लहान होतात. तुम्हांला दुःख कळत नव्हतं. तुम्ही आपल्या मुलासारखं शिकत गेलांत. आमचं तसं नाहीं. मीं संसार केलेला; मला फार दुःख झालं. रडून रडून अगदीं डोकं हलकं झालं बघा. त्यामुळें वाचलं लिहिलं कीं डोकं दुखूं लागे. मग कुठं शेजीबाईशीं गप्पा कराव्या, करमणूक म्हणून कथापुराण, सिनेमा असं करावं तेव्हां मन त्यांत विसरे आणि आतां तर काय, वय जास्त झालं! ताईच्या घरीं बारा वर्षं कशीं सुखानें एक दिवसासारखीं गेलीं. देहाला सुखाची संवय लागली. कष्ट आतां होत नाहींत बरं. तेव्हां अशा माणसांच्या जिवाला विरंगुळा व्हावा असं तुमच्या कर्व्यांनीं काय केलं आहे? असलं कांहीं तर सागा. मी येतें."

"कर्व्यांनीं तसं कांहींच केलं नाहीं." मी उत्तरलें. "जगांतल्या प्रत्येक स्त्रीला फायदा घेतां येईल असं कर्व्यांना करतां आलं नाहीं खरं. कर्व्यांचं काम अपुरं." मीं सहेतुक म्हटलं. पण तें कांहीं त्यांच्या ध्यानांत आलेलें दिसलें नाहीं.

"आणि म्हणून तर मीं म्हटलं आपलं जावं आमच्या ताईमहाराजांच्याकडे. कृष्णाबाई, त्यांनीं मला गुरुमंत्र दिला व सांगितलं, कथापुराण ऐक व चिंतन करीत जा. त्यामुळें बघा मनाला एकदम शांत वाटलं; मला बरेच विचार सुचूं लागले आहेत."

आतांपर्यंत खोल्यांची पाहणी करीत करीत पुस्तकांच्या शेल्फांपर्यंत त्या येऊन पोंचल्या होत्या. "काय हो, सगळीं इंग्रजीच पुस्तकं तुम्हांला वाचावीं लागतात का? तुम्हांला आम्हीं काय सांगायचं म्हणा, पण या भाराभर इंग्रजी पुस्तकांनीं काय होणार! आमच्या गुरुदेवाकडे एकदां चला. हें सगळं फुकट आहे बरं. तुम्ही कांहीं संवस्कृत वाचतां का? त्यांत फार बोध उपदेश आहे. अहो, आपली देवभाषा ना ती! त्यांत गीता आहे, ब्रह्मविद्या सांगितली आहे. आणखी हें कसलें पुस्तक? ब्र-ह्म-सू-त्र—शां—क—र—भा—ष्य. यांत कांहीं ब्रह्मविद्या आहे का हो? आमचे गुरुदेव सांगतात ना! मुख्य भ्रम. बाकी

सगळी माया! आणि आपलं मन किनी फार अचपळ! अगदीं वाराच जसा. तें ताब्यांत ठेवतां यावं लागतं हो! मी पुष्कळ।म्हणतें कीं, माझा उतावळा स्वभाव कसा जाईल. किती आवरावं. पण मोठं कठीण आहे तें. हें आपलं मन म्हणजे रॉकेल तेलाची बाटली आहे. त्यांतलं रागलोभ हें रॉकेल काढायचं न् शमदम हें अत्तर भरायचं. किती अत्तर भरलं तरी वस्सदिशी रॉकेलची घाण येते मधेंच. तुमच्या पुस्तकांत कांहीं असलंच आहे का हो? आमच्या गुरुदेवांचे दृष्टान्त किनी ऐकले कीं पटतात एकदम.

"हो, थोडसं असंच" मी उत्तरलें.

"मग मी येऊं का तुमच्या तासाला. शिवाय मला तुमचं कॉलेज पहायचं आहेच. तुमचे प्रोफेसर कसें व्याख्यान देतात तेंही ऐकायचं आहे."

"तुम्हांला काय त्यांत मौज वाटणार? कॉलेजवर चला, पण व्याख्यानं कांहीं तुम्हाला कळायचीं नाहींत."

"न कळायला काय झालं! काय आमच्या गुरुदेवाच्या प्रवचनांपेक्षां कठीण आहेत? पण आतां सगळं इंग्रजींतच असलं तर मात्र आमची मति कुंठित आहे. मीं आपलं म्हटलं पुरुषांच्या कॉलेजांत एक आपल्याला कळायचं नाहीं; पण बायकांच्या कॉलेजांत तर कळायला हरकत नाहीं. बायकांना कळेल असं शिकवायचं नाहीं तर बायकांचं कॉलेज कशाला काढायचं! निदान तुमच्या पुण्याच्या मुली, त्यांच्या पोषाकाच्या नव्या तऱ्हा काय आहेत, खेळतात कशा, गाणीं कशीं म्हणतात तें तर कळेल."

"हो तें कळेल. मी मुळीं तुम्हांला कुसुमच्या खोलींतच नेऊन बसवतें म्हणजे तर झालं. मग असं करा, उद्यां साडेदहाला या म्हणजे आपण दोघी टांग्यांतून जाऊं. ठरलं?"

"हो ठरलं. मी उद्यां येतें. चला खालीं; थोडें तुमच्या आईंना भेटावं व मग जावं" असं म्हणत कृष्णाबाईंनीं शालजोडी उचलली व आम्ही दोघी दारापर्यंत गेलों. "पण हें पहा कमळाबाई, मी आपली मनमोकळेपणानं सांगतें. मी आज रात्रीं तुमच्याकडे रहायला येतें. तुमच्याचबरोबर जेवेन व टांग्यांतनं कॉलेजांत जाऊं. आमच्या ताईंची मैत्रीण म्हणजे मला धाकट्या बहिणीसारखी. तुम्हांला सुचवलं तर तुम्ही रागावणार नाहीं. मला माहीत होतं हें बारीक तुमच्या लक्षांत येणार नाहीं. तुमचा आपला पुरुषासारखा स्वभाव. पुस्तकं वाचून वाचून व्यवहारज्ञान गेलं!"

---

# चिमण्या



माझ्या अंगणांत। चिमण्यांची किलबील।
हळू पाय टाका। भुर्र उडूनी जातील॥

## वारुवती : : : १

त्याचं असं झालं! तिनेच हें नांव स्वतःला ठेवून घेतलं.
आईबापांनी तिचें नांव वाराणाशी ऊर्फ वारू ठेवलें. अर्थात् वारू रूढ झालें व त्यांतूनहि 'वारी' असेंच जास्त म्हटलें जाई. आपलें नांव अगदींच रुक्ष व अनन्वयावत् आहे असें तिला शाळेंत आल्यावर वाटलें.

तिच्या वडिलांनी तिला फारच लवकर शाळेंत पाठविली. वसतिगृहांत ती आली ती हातांत बाहुली खेळावयास घेऊन. व्यवस्थापिका व सर्व शिक्षक म्हणाले, 'ही मुलगी आईबापांना सोडून राहील का?'

'दोन महिने पाहूं. नाहीच राहिली तर परत घेऊन जाऊं!' आप्पाकाका म्हणाले. पण त्यांना परत न्यावयाची वेळच आली नाहीं तिला! कोणत्याहि गोष्टीबद्दल तक्रार नसणें हें तिचें वैशिष्ट्य. जेवणाखाणांत आवडानिवड नाही, कपड्यालत्त्यांचा हट्ट नाहीं, खोलींत एकटें झोपण्याला भीति नाही; घरांतून एकदम पन्नास मुलींच्या वसतिगृहांत आल्यावर थोड्या तरी खोडी या वयाला असावयाच्याच. पण तिने या बाबतींत कधीच तक्रार केली नाहीं, किंवा तिच्याबद्दल कोणाची कधी तक्रार आली नाही. हसत चेहरा, टपोरे भिराभिरते डोळे यांमुळे तिचा सावळा रंग व बैठें नाक यांच्याकडे प्रथम लक्षच जात नसे लोकांचें. भिरभिरत्या डोळ्यांमुळे वाटे ही आता येऊन तुम्हांला कांही तरी सांगणार आहे. पण मोठ्या माणसांत ती फार अबोल असे. प्रश्न विचारला तर उत्तर देई. पण तेंच समवयस्क मैत्रिणींत नुसता पोपट. दुरून त्यांच्या गप्पा ऐकाव्या, म्हणजे वारुवतीचें पांडित्य कळे. एकदोन महिन्यातच ती आपल्या मैत्रिणींत इतकी रंगून गेली की, आप्पाकाका भेटावयास आले, म्हणजे शोधून आणावी लागे तिला मैत्रिणींच्या मेळ्यांतून! वडील बहिणी विनोदाने

तिच्या कंपूला 'वारू-मंडळ' म्हणत. व धूम ठोकीत जाण्याचा त्यांचा सर्वांचा हातखंडा पाहिला, म्हणजे वारू-मंडळ नांव कांही निरर्थक नव्हतें. तसें तिचें 'वारू' नांवहि योग्य आहे असें सर्व म्हणत. पण तिला आपलें वाटत असे की, काय आपलें नांव अगदींच जुनाट व गद्य.

एकदा त्यांच्या मंडळांत टूम निघाली की, साऱ्या मैत्रिणींचीं नांवें छान छान करावयाचीं. इंदूचें नांव इंदुमती होतेंच. 'चंपक'चें नांवहि चांगलें असलें, तरी तिनेहि इंदुमतीशीं जमण्यासाठी चंपावती लिहिण्याला सुरुवात केली. तिसरी यमू. तिचें पाळण्यांतील नांव 'भानुमती' होतें. त्याचेंच तिने पुनरुज्जीवन केलें व म्हणून वारूनेहि आपलें नांव भानुमती नांवाशीं यमक जुळेल असें वारुवती केलें व सर्व वह्यांवर लिहूनहि टाकलें. खरं म्हणजे या नांवाचा प्रथम मैत्रिणींत प्रसार होऊन तें मग सर्व शाळेंत व वसतिगृहांत रूढ व्हावयाचें. पण प्रचारक्रम थोडा उलटा झाला. ती कॉलेजच्या मुलींच्या खोलींत राही. कारण तिची एक मोठी बहीण कॉलेजांत होती; व त्यांच्या वसतिगृहांत अशी सोय होती की, अगदीच लहान व नवी मुलगी असेल तिला तिच्या वडील बहिणीजवळ अगर मोठ्या नातेवाईक मुलीजवळ कांही दिवस ठेवीत. तिच्या बहिणीने डेस्क लावतांना तें नांव पाहून आपल्या मैत्रिणींना दाखविलं. आधीच मोठ्या वर्गांतल्या मुलींना लहान वर्गांतल्या मुलींची चेष्टा करावयास हवी असते. त्यांतून त्या कॉलेजाच्या मुली पडल्या. दहा वाजतां वारू खोलींत येते तों एकीने हाक मारली, 'काय वारुवती! झाला का अभ्यास?' 'का हो वारुवती! ताटें मांडतां का? जेवणाची घंटा झाली!' दुसरीने हसत प्रश्न केला व थोड्याच वेळांत सर्वचजणी पुस्तकें ठेवून तिच्याभोवती गोळा झाल्या व वारुवती नांवाचें सहास्य परीक्षण होऊन वारुवती, यमुमती, बनुवती, घारुमती इ. अनेक नांवांच्या जोड्या निर्माण झाल्या. कॉलेज-त्राटिका बनी म्हणाली, 'शाबास हो वारुवती! कसं बाई तुला हें सुचलं. आता हें माझं नांव; सुंदर करावंसं वाटे; पण माझी आपली कल्पना की, नांव बदलावयाची वेळ एकच व ती म्हणजे लग्न. पण आमचं तें कुठून होणार? बाळूकडे वळून ती पुढे म्हणाली, 'ऐकलंस ग बाळू, आजपासून माझं नांव बनुवती व तुझं बाळुमती. नुसतं बाळू म्हटलं म्हणजे लोक विचारतात, 'तुमच्या रेसिडेन्सींत हा मुलगा कोण?' चंपावती नांव खपतें तर 'वारुवती' कां खपूं नये हें तिला कळेना. पण ती चिडली नाही की रडली नाहीं. कॉलेजाच्या मुलींमध्ये आपल्या

नांवाचें समर्थनहि तिने केलें नाही. सर्वांची चर्चा ऐकून, थोडेंसें हसून तिने जी धूम ठोकली ती विद्यालयांतून आश्रमांत; व चंपकच्या कानांत जाऊन सांगितलें, 'अग, कॉलेजाच्या मुली आपल्या नांवानं हसतात ग!' 'अस्सं' चंपीने हसत प्रश्न केला, 'काय काय ग, म्हणाल्या त्या?'

वारुवतीने हळूहळू सर्व हकीकत सांगायला सुरुवात केली. तिचें कुजबुजून सांगणें, चंपीची हसरी मुद्रा व त्यांत गालाला पडलेली खळी पाहून, कांही तरी विशेष मनोरंजक गुपित असलें पाहिजे असें समोरून येणाऱ्या यमूला सहजच वाटलें. 'काय ग!' 'काय ग!' आम्हांला नाही का सांगायचं?' असें म्हणत दोघींच्या खांद्यावर हात ठेवून यमूहि त्यांत सामील झाली.

'चला ग, आपण इंदूला सांगूं या!' यमूने सल्ला दिला व हें गुपित सांगण्यासाठी तिघी मैत्रिणी गळ्यांत गळे घालून धावत इंदूकडे निघाल्या. 'ए, आपण हें गुपित कुणालाच सांगावयाचें नाही ग!' सर्व हकीगत ऐकून इंदूने आपला सल्ला दिला व आपण कांही महत्त्वाचा सल्ला देत आहोंत या कल्पनेने तिचे मोठे टपोरे तेजस्वी डोळे जास्तच पाणीदार दिसूं लागले. उगीच नाही काळीसावळी असूनसुद्धा तिला मागच्या संमेलनांत मुरली वाजविणाऱ्या कृष्णाचें मुख्य काम मिळालें तें! त्यांनी आपल्या बेताप्रमाणे ही हकिगत अगदी गुप्त ठेवली, तरी पण संध्याकाळपर्यंत त्यांचीं नांवें आश्रमविद्यालयभर झालींच.

वारूमंडळांतील सर्व गोष्टी 'गुपित' ठेवण्याचा त्यांचा मोठा कटाक्ष. सुट्टी सुरू झाली; घरीं जातांना एकमेकीला पत्रें पाठविण्याचें ठरलें. पहिलें पत्र कोंकणकन्या चंपकने वारुवतीला लिहिलें. कार्डावर मोठ्या अक्षरांत प्रथमच 'हें पत्र गुप्त आहे. कोणास दाखवूं नकोस' अशी आपल्या मैत्रिणीस सूचना दिली होती व पुढे 'जमती जमती' लिहिल्या. प्रथम तें कार्ड वारुवतीच्या मामांच्या हातीं आलें. त्यांनी तें तिच्या आईला दाखविलें, मग तिच्या बहिणीने पाहिलें व मग तें पत्र वारुवतीच्या हातीं आलें. 'वारुवती, आपली मैत्रिण काय लिहिते?' आप्पाकाकांनी जेवतांना मुद्दाम प्रश्न केला.

'तें आमचं गुपित आहे. सांगावयाचं नाही,' येवढें उत्तर देऊन वारुवतीने आपल्या मंडळाचें गुपित राखलें.

ती शाळेंत आल्यावर थोड्याच दिवसांत मॅट्रिक्युलेशन परीक्षेची चर्चा सुरू झाली. त्यांच्याच शाळेंतून कांही मुली परीक्षेला जावयाच्या होत्या. त्यांच्या

अभ्यासाची गडबड व परीक्षेची चर्चा रोज ऐके. मॅट्रिक नापास झाल्याचीं वर्णनेंहि तिला ऐकूं येत; व एकंदरींत त्या परीक्षेबद्दल विशेषतः त्या नांवावरूनच तिला फार आदरयुक्त भीति वाटे. परीक्षांचा क्रम तिने अजून कधी ऐकलाच नव्हता. मराठी दुसरींत तर ती बसली होती. एके दिवशीं त्यांच्या शाळेंत एक सभा झाली व ती मोठी परीक्षा पास झालेल्या मुलींची त्यांत स्तुति होती. सभा संपून वारूमंडळ एकत्र होतांच पुनः त्या परीक्षेच्या गोष्टी निघाल्या.

'खरीच का ग ती परीक्षा इतकी कठीण असते?' एकीने प्रश्न टाकला.

'ए, आपण कधी जाऊं ग त्या परीक्षेला?' दुसरी मनोराज्य करूं लागली.

आपल्या शाळेंतले सगळे मास्तर व बाई झाल्या असतील नाही मॅट्रिक?" इंदूने प्रश्न केला.

"छे ग! ते मॅट्रिक असते, तर त्यांनी मुलींची कशाला ग स्तुति केली असती?" एकीने तर्कशास्त्राचा उपयोग केला.

"सगळ्यांचें कोणाला ठाऊक, पण दादा खासच ती परीक्षा पास झाले आहेत. अग ते एम्. ए. आहेत" चंपकने आपल्याला असलेली जास्त माहिती सांगितली.

'मग एम्. ए. असतील म्हणून मॅट्रिक कशावरून आहेत?' वारूने आक्षेप घेतला. "मॅट्रिक झाल्याखेरीज एम्. ए. होतात वाटतं?" एकीने शंका काढली.

"वाहवारे! न व्हायला काय झालें. मला काल संध्याकाळचं जेवण गेलं नाही म्हणजे आजचं जात नाही की काय?" वारुवती. दोन तट पडून मोठी खडाखंगी उडाली व शेवटी दादांच्याकडे जाऊनच या प्रश्नाचा निकाल करण्याचें ठरलें–दादा दिवेकर प्रार्थनेला जाण्यासाठी जों दारांत येतात तों ही बालचमू उभी!

'दादा, आम्हांला तुम्हांला एक प्रश्न विचारावयाचा आहे. विचारूं का?' चंपावतीने प्रश्न विचारला. 'दादा, तुम्ही एम्. ए. झालांत,' वारुवतीने सुरुवात केली, 'पण तुम्ही मॅट्रिक झालां का?'

दादा एक क्षणच गोंधळल्यासारखे झाले; पण लगेच गंभीरपणें त्यांनी सांगितलें, "नाही बुवा!" आणि वारुवतीचें म्हणणें खरें ठरलें.

पुढे दादांनी प्रार्थनेंत विनोदानें सांगितले की, आमच्या कांही मुलींना प्रश्न पडतो की एम्. ए. ची परीक्षा आधी की मॅट्रिक्युलेशन आधी?



## गो दू : : : २

ती शाळेंत कां येई तें तिच्या वडिलांना माहीत असावें. तिला तें माहीत नव्हतें. कारण त्या प्रश्नाचा तिने कधी विचारच केला नव्हता. वडील म्हणत, 'जाईना थोरल्या बहिणीबरोबर शाळेंत. सुमति जातेच आहे, तिच्या सोबतीने हीपण जाईल.' सुमति आपल्या पुस्तकाबरोबरच तिचीं पुस्तकें गोळा करून तिच्या पिशवींत भरी. आई हाक मारून वेळेवर जेवावयास बसवी व सगळींच भावंडें अकरा वाजता घराबाहेर पडत. तिच्या शाळेंत जाण्याच्या इच्छेबद्दल तिला कोणीं कधी विचारलेंच नाही. म्हणजे वडील, आई व बहीण यांच्या जुलमाला ती मुकाट्यानें मान तुकवीत असे, इतकी ती गरीब होती असें नव्हे. घरीं नाही तरी सर्व भावंडें शाळेंत गेलीं म्हणजे जरा एकटेंच वाटावयाचें; त्यापेक्षा शाळेंत सत्तेच्या चार मैत्रिणी खेळावयास मिळत व एकंदर कांही फारसें वाईट वाटलें नाही तिला तेथे. त्यामुळे वडील मंडळींच्या म्हणण्याला तिने विरोध केला नाही इतकेंच. बाकी विचार करण्याच्या फारशा भानगडींतच ती पडत नसे; किंवा शाळेमधील गरीब, भांडखोर, दांडगी, अभ्यासू, हुशार इ. शब्दांच्या अर्थाचाहि तिच्या मनावर कधी परिणाम होत नसे.

सुरुवातीची प्रार्थना, दहा मिनिटांची सुटी, मधली सुटी, ड्रॉइंगचा तास हे शाळेंतील कार्यक्रम तिला फार पसंत पडत. इतर तासांनासुद्धा तिचा वेळ मोठा छान जाई. एका हाताने पुढे आलेल्या केसांच्या बटा, नव्हे झिपऱ्या सावरीत व दुसऱ्या हाताने वर्गांत चालू असलेला धडा शोधून काढण्यांत तासाचा किती तरी वेळ जाई. मध्येच चित्र सापडल्यास चित्रकाराच्या चुका दुरुस्त करून, चित्रगत व्यक्तीला दागदागिने काढावयाचें अगर नवीनच चित्र काढून शेजारच्या मुलीला दाखवावयाचें. थोड्याच दिवसांच्या अनुभवावरून तिने ठरविलें होतें की, हें चित्रकौशल्य उघडपणें मैत्रिणींना न दाखवितां बांकाखालून दाखविणें जास्त सोयीचें. उघड दाखवूं लागलें, तर उगीच मास्तरांच्या बोलण्याने त्यांत व्यत्यय येतो — आणि एकंदरींत मुलींचें लक्ष मास्तरांच्या शिकविण्यापेक्षा आपल्या कर्तबगारीकडे ओढून घेण्याचें तिला चांगलें जमूं लागलें. वयोवृद्ध ढोबळे मास्तर तर ऑफिसांत आले म्हणजे

प्रांजलपणें मुख्याध्यापिकेला सांगत, 'आज तास ठीक झाला, कारण ती गैरहजर होती. तुमची ती चपला आहे ना, तिला आवरतांना पुरेवाट होते. इतर जास्त दहा मुली वर्गांत पुरवतील, पण ही चपला नको.'

ती मुलींशीं भांडे, मारामारी करावयासहि तिची तयारी असे; तरी पण ती मुलींना हवीशी वाटे. मधल्या सुटींत घरच्या रायआवळयाच्या झाडाचे ती पसा पसा आवळे काढून आणी व मोठ्या उदारपणाने सर्व मैत्रिणींना वांटे. एके दिवशीं आवळे वांटण्याचें काम अगदीं भरांत आलें होतें. पांच पंचवीस-जणींचे हात तिच्याभोवती आवळयासाठी पसरले होते व गोदू मोठ्या आस्थेने आवळे वांटीत होती. पाठीमागून मोठ्या बाई आल्या, त्यांनी मुकाट्याने येऊन आपलाहि हात त्या मुलींच्या हातांमध्ये पसरून धरला. गोदूला वाटलें, ही कोणी तरी मुलगी एकदा आवळे घेऊन पुनः हात पुढे करीत आहे. 'तुला नाही जा आता! एकदा खाऊन पुनः मागतेस' असें म्हणून येवढी आपल्यापेक्षा धट्ट मुलगी कोण आहे हें पाहण्यासाठी तिने मागे वळून पाहिलें. हात बाईंचा आहे हें दिसतांच व भोवतालच्या मुलींहि दचकून मागे सरतांच हातांतील पिशवी तशीच टाकून तिने पळ काढला. पण मुठींतील दोन आवळे टाकून न देतां तोंडांत घालावयास ती विसरली नाहीं.

राग येतांच कोणासहि ताड्दिशी बोलून ती मोकळी होई. आठवड्याची परीक्षा झाली होती व ढोबळे मास्तर पेपर घेऊन वर्गांत आले. सर्वांत जास्त मार्क मिळालेला रुक्मिणीचा पेपर व सर्वांत कमी मार्क व जास्त चुका असलेला गोदूचा पेपर त्यांनी प्रथम घेतला व रुक्मिणीच्या स्पेलिंगची, लेखनाची फार स्तुति केली. तुलनेने गोदूचा पेपर हास्यास्पद ठरलाच होता. पेपर समजावून सांगून मास्तर पुढील धड्याकडे वळले. प्रसंगाने त्यांनी गोदूस प्रश्न केला. "वुइक म्हणजे आठवडा या शब्दाचें स्पेलिंग करा पाहूं, गोदूबाई" मास्तर.

आता मात्र गोदूला राग आला होता.

"तुमच्या प्रिय रुक्मिणीला विचारा मास्तर," ताड्दिशी उत्तर देऊन ती गप्प बसली. मास्तरनी एकदम कपाळाला हात लावला. जरा मोठ्या मुली होत्या त्या साभिप्राय हसूं लागल्या. पण त्याचा अर्थ तिला कळला नाही. भाषेच्या खाचाखोचा तिला इतक्या कळल्या नव्हत्या. 'स्तुति करावयाला रुक्मिणी आणि प्रश्नाचं उत्तर द्यायला तेवढी गोदू नाही का?' इतकाच तिचा अभिप्राय होता.

वर्गातील मुलींचें अवधान शिक्षकाकडून आपल्याकडे ओढून घ्यावयाच्या तिच्या कलेमुळें एक दिवशी ढोबळे मास्तरांना तिला वर्गाबाहेर घालविण्याचा प्रसंग आला पंधरा-वीस मिनिटें झाल्यावर तिला वर्गात परत बोलवावी म्हणून मास्तर वर्गाच्या दाराशी येतात तों गोदू तेथून पसार झालेली. आपल्या शिक्षेचा हा उलट परिणाम पाहून मास्तरानी ऑफिसांत तिच्याविरुद्ध तक्रार नोंदविली. दर दोन-तीन दिवसांनी गोदूबद्दल तीन-चार तक्रारी येतच असत. थोड्याच वेळांत गोदूबाईची स्वारी, तोंड उन्हाने लाल झालें आहे, खिशांत कांही भरल्यामुळे ते मोठे दिसत आहेत अशी झिपऱ्या सावरीत, शाळेच्या दारातून आंत शिरतांना दिसली. थोरल्या बाईनी गोदूस ऑफिसांत बोलावून घेतलें व चौकशी केली.

" बाई, घरीं जाऊन आलें," गोदूने सरळ उत्तर दिलें.

" मास्तरांनी वर्गाबाहेर उभें राहावयास सांगितलें तें दंगा करूं नये म्हणून की घरीं लवकर खायला जातां यावें म्हणून ?" यावर गोदू जरा गप्पच उभी राहिली होती.

" तुला काय वाटलें की येवीतेवी मास्तर वर्गाबाहेर जा म्हणतात; खाऊन येऊं या कांही ! तेवढाच मधल्या सुटींतला खेळण्याचा वेळ वांचला." बाईंनीं स्पष्टीकरणात्मक खुलासा केला. गोदूस एकदम हसूं आलें. कारण तिच्या मनांतला विचार बाईंनी बोलून दाखविला होता.

थोड्या वेळाने वादळांतून जिवानिशी सुटल्याप्रमाणे केसाच्या बटा सावरीत ती ऑफिसमधून बाहेर आली. " ए, काय म्हणाल्या ग बाई ?" तिच्या मैत्रिणींनी तिच्याभोवती गराडा घालून प्रश्न केला.

" तें जाऊं दे ग!" मान हालवीत गोदू म्हणाली. " चला आपण खेळास सुरुवात करूं. दे टाळी. हुऽतुतूऽऽऽ!"



## लि ली : : : २

" ए शांताताई, माझें लग्न करना!" पांच वर्षांच्या लिलीने हट्ट घेतला होता. दुपारचे दोन वाजले. घरकाम संपवून आता कोठे शांताताई दुपारची विश्रांति घेण्यासाठी आडवी होत होती. तोंच धावत धावत लिली

घरांत आली. शेजारच्या घरीं लग्न होतें व सर्वच लहान मुलें तिकडे जेवावयास गेलीं होतीं. लिली जी आली ती थेट शांताताईच्या खोलींत व डोक्याशीं बसून तिने वरील प्रश्न विचारावयास सुरुवात केली.

'कसलं आलं आहे लग्न?' डोळे मिटल्या मिटल्या शांताताईनी उत्तर दिलें, 'जा तिकडे खेळायला, मला त्रास देऊं नकोस.' वडिलांच्याजवळ मागणी करावयास साधारणपणें ती भीत असे. पण आज ती त्यांच्याकडेहि गेली. अण्णा सायकलमध्ये वारा भरीत होते. लीलाचा प्रश्न ऐकून 'काय लग्न? आणखी दहा वर्षें लग्नबिग्न कांही नाहीं' असें म्हणून ते सायकलवर बसून निघून गेले. दहा वर्षें म्हणजे आणखी किती थांबावें लागेल याची जरी तिला कल्पना आली नाही, तरी अण्णा ऑफिसांत जावयाच्या गडबडींत आहेत येवढें तिला कळलें. आजी-काका यांच्याकडेहि ती गेली. पण तिच्या लग्नाच्या काळजीने दुपारचें जाग्रण करण्याला कोणीच तयार नव्हतें.

लिलीने पाहिलें कोणाजवळ कांही मात्रा चालत नाही. तेव्हा निमूटपणें ती उठली व हायकोर्टाकडे गेली. तेथे तिचें काम हटकून होणार, दाद लागणार अशी तिची खात्री होती. दुडदुड धावत जाऊन जिना चढून ती माडीवर गेली. आजोबा वाचीत बसले होते, तेथे मागून जाऊन आपल्या चिमुकल्या हातांनी त्यांच्या गळां मिठी घातली व लडिवाळपणें तिने विचारलें, "तात्या, तुम्ही माझं लग्न करताल का? कराना!" तिचा प्रश्न ऐकून आजोबांना मौज वाटली. हातांतील पुस्तक बाजूला ठेवून त्यांनी तिला पुढे ओढून घेतली व तिचे दोनहि हात धरून विचारलें "काय म्हणतेस, लिले?"

लिलाने आपल्या प्रश्नाची पुनरावृत्ति तितक्याच लडिवाळपणें केली.

'लग्न!' आजोबा म्हणाले, 'इतक्यांत कशाला? करूं पुढे. तूं मोठी हो, शाळेंत जा, खूप खूप शीक, मग करूं लग्न.'

'नाही पण, तात्या, लग्न करायला शिकायला हो कशाला हवं? आताच कराना! उद्या करा लग्न'. लीलाचा हट्ट चालूच होता.

'बरं, मग तूं काय करशील तुझं लग्न केलं तर'? तिच्या म्हणण्याचा भावार्थ काय आहे हें जास्त समजून घेण्यासाठी आजोबांनी पुनः पृच्छा केली.

"मी होय? मी साडी नेसेन, बायकांना हळद-कुंकू देईन व खिरापत वांटीन."

लग्न म्हणजे 'हळद-कुंकू' हें आतां आजोबांच्या लक्षांत आलें. चैत्र महिना

नुकताच संपत होता व वैशाख चालू होता. त्यामुळे चैत्रगौरीचे व लग्नांतील हळद-कुंकवाचे समारंभ ती रोज पाहत असे व आताहि लग्नघरून जेवूनच आली होती. आजोबांनी सांगितलें, करूं हं उद्या तुझं लग्न !

नाही तरी नातवंडें जास्त लाडकीं असतातच आजी-आजोबांचीं साऱ्या घरांतून. आणि त्यांतून पहिलें नातवंड म्हणून लिलीला जरा जास्तच भाव चढला होता. शिवाय दिसेहि पोर मोठी गोड. गोरीपान, बाळसें भरपूर, कुरळे केस, वाटोळा सदा हसरा चेहरा. कोणीहि एकदम पाहून म्हणे " काय गोड आहे हो पोर ! " मग मागून ध्यानांत येई की, नाक जरा बसकेंच आहे नाही ? तिचा शांतपणा, हसरेपणा व बोलकेपणा यामुळे ती सर्वांनाच आवडे व आजोबांनाहि काम करतांना ती जवळ बसलेली चालत असे. घरांत आजोबाला जर सर्वांत कमी कोणी भीत असेल, तर लिली ! मनांत आलें की सरळ जिना चढून वर जाई; आजोबा लिहीत-वाचीत असले तरी मांडीवर चढून बसे व त्यांची पेन्सिल घेऊन म्हणे, " तात्या झोप आलीना !"

" मग जाऊन नीज जा."

" पण तुम्ही चलाना गोष्ट सांगायला ! "

मग आजोबांनी उठून तिला बिछान्यावर ठेवावी, तिला गोष्ट सांगावी. पाय दुखतो म्हणाली तर चेपून द्यावा आणि मग आमच्या लिलीला स्वस्थ झोप येई.

आजोबांच्याकडे माडीवर जावयाची लहर आली की अंगणांत उभी राहून ती हाक मारी व म्हणे, " तात्या, मी माडीवर येऊं ? "

" हो, ये की ! " तात्या गच्चीमध्ये उभें राहून सांगत.

" तसं नाही कांही " लिली लडिवाळपणें सांगे, " तुम्ही येऊन वर घेऊन जा.

भिलेपणा अगर लाजरेपणा तिला माहीतच नव्हता. ध्यानांत आलेल्या गोष्टींचा तत्काळ व्यवहारांत उपयोग करून ती मोकळी होई. बुवाची भीति लहान भावंडांना दाखवितांना तिने पाहिलें होतें. दाढी व केस खूप असले म्हणजे बुवा होतो अशी तिची कल्पना होती. डॉ. मुंजे यांच्यासारखे दाढी-वाले गृहस्थ घरीं पाहुणे आले, तेव्हां त्यांच्यासमोरच धाकट्या मधूला ती मोठ्याने सांगे, " मधु, रडूं नको हं ! तो बघ बुवा ! "

हळूहळू वर्षें जाऊं लागलीं व लिलीच्या चिमुकल्या जगाचें क्षितिज रुंदावूं

लागलें. त्यांत भावंडें आलीं, शाळा आली, शाळेच्या मुली आल्या व जगाच्या नवीन नवीन प्रकट होणाऱ्या नवलाईने पहिल्या पहिल्या गोष्टी मागे पडूं लागल्या. प्रभातफेऱ्यांतील गाणीं, शाळेमधले खेळ व गाणीं यांचाच कांही दिवस तिच्यावर फार पगडा होता.

'चला उठा चला उठा हिंददेशरक्षणा' हें प्रभातफेरीचें पद अगर 'कृष्णासि रमवाया जाऊं चला' हें गोफाचें पद याखेरीज तिला पुष्कळ दिवस कांही सुचत नसे. शाळेंतील मुली, मास्तर-मास्तरणी यांचीं वर्णनें ती जेवतांना सांगत सुटे. 'सांगू का ऽ' असा हेल काढून ती बोलावयास सुरुवात करी व म्हणे, 'सांगू का ऽ ऽ आमच्या बाईंनी कनी, काल एक छानसं पातळ आणलं आहे.' आमचे मास्तर म्हणतात, 'जास्त बोललां तर वर्गाबाहेर घालवून देईन.' की लगेच आजीकडे वळून म्हणे, 'ए ताई, मला लाडू देशील मधलीला खायला?'

आणखीहि कांही दिवस गेले व लिलीचें अवधान सर्वस्वी तिच्या मैत्रिणींत केंद्रित होऊं लागलें. म्हणजे ती अजून कौतुक करून घ्यायला चुकते असें नाही. रात्री बिछान्यावर निजली असतां हाक मारून म्हणेल, 'ए ताईग! थंडी लागतेना!'

माजघरांत फराळ करावयास बसलेल्या आजोबांनी हें ऐकलें म्हणजे ते म्हणतात, 'लिले, तुला ओठावरच्या जांभळाची गोष्ट माहीत आहे का?'

'ती काय?' लिली डोळे उघडून प्रश्न करते.

'एक आळशी मनुष्य होता. तो जांभळाच्या झाडाखाली निजला होता. त्याच्या ओठावर वरून एक जांभूळ पडलें. तेव्हा तो लोकांना हाका मारूं लागला, 'अरे! कोणी तरी एवढें जांभूळ माझ्या तोंडांत लोटाल काय?'

पण एवढी गोष्ट सांगून होईपर्यंत आजी स्वयंपाकघरांतून येई व लिलीच्या अंगावर पांघरूण टाकून म्हणे, 'लिले, या गोष्टीचें तात्पर्य काय?'

'पण तूं तर आता पांघरूण घातलंसच की!' असें डोळे मिटून लिली उत्तर देई व या कुशीची त्या कुशीला वळे.

कोणीं खाऊला रुपया दिला तर इतर कोणाजवळ न देतां ती आजोबांच्या जवळ देई व चार दिवसांनी व्याजासह दोन रुपये परत घेत असे. आता मात्र या गोष्टींत तिचें मन इतकें रमत नाही, मधलीचें खाणें अगर खाऊच्या रुपयापेक्षा साड्यांच्या रंगाबद्दल तिची खळखळ फार. तिच्या आवडीच्या साड्या शोधतांना आई कंटाळते व शेवटी सांगते, 'आतां आणून देईन तें पातळ अगर

साडी नेसलीस तर ठीक, नाही तर घालीन एक धपका. तुझ्या मैत्रिणींच्या साड्यांचे रंग असतील तेवढेच चांगले व आम्ही पसंत करतों ते आम्हांला कांही कळत नाही का ?'

पण मैत्रिणींच्या साड्यांचे रंगाबरोबर रंग जमल्याखेरीज तिचें समाधान होत नाही हें खरें. पूर्वींची अकारण बडबड तर थांबलीच व जेवतांना जेवणापेक्षा तिच्या डोक्यांत मैत्रिणींच्या गमतीच जास्त असतात. आई म्हणते, 'ए भ्रमिष्ट, लक्ष आहे का जेवणांत ?' पण तिचें लक्ष असतें यांत की, केव्हा एकदा जेवण उरकून दीक्षित – तिची मैत्रीण – ला जाऊन भेटेन. सकाळ-दुपार अभ्यास व शाळा आणि संध्याकाळ व सुटी मैत्रिणींच्या मेळ्यांत, यामुळे घरांतल्या माणसांशीं बोलायला तिला वेळच उरत नाही. खालच्या वर्गांतील फालतू विषय वरच्या इयत्तेच्या वेळापत्रकांतून कमी व्हावेत तसे तिच्या बदलत्या वेळापत्रकांत आजी, आजोबा, वडील यांना जागा उरत नसे. आजोबाच दोन दिवसांनी चौकशी करतात, 'आज दोन दिवसांत लिली गेली आहे कोठे ?' मग मात्र हसत मान वेळावीत येऊन लाडिकपणें सांगेल, 'तात्या, सांगूऽ का ! आमच्या ठेंगडीच्या घरीं आज तिचा वाढदिवस होता.'

आणि कोणीं तिला सांगितलें की, लिले, आजोबांना विचारून ये की, उद्या तुझं लग्न करायचं का ?' तर पदर गळ्याभोवती गुंडाळीत 'अय्या' म्हणून भर्‌दिशी एक गिरकी घेऊन ठेंगडीच्या घरीं खेळायला पळून जाईल.



## सो नू : : : ४

सोनू हें तिचें नांव हजेरीपटावर लिहिलेलें होतें. पण शाळेंत, तिच्या आळींत, मैत्रिणींच्या मेळ्यांत, ती वेगळ्याच नांवाने ओळखली जाई. कोणी म्हणत सोनबा तर कोणी म्हणत दांडोबा अगर पठ्या; पठाणहि केव्हा केव्हा म्हणत तिला आणि तीं नांवें तिला शोभून दिसत. प्रथम तिला मुलांच्याच शाळेंत पाठविली होती वडिलांनी. पण खोड्या व भांडणें यांनी तेथेहि ती उठून दिसे. एकदा हिने तोंडांत दिल्याबद्दल एका मुलानेच रडत रडत तक्रार नेली होती हेडमास्तरांच्याकडे असें सांगतात. तेव्हां हेडमास्तरांनी वडिलांना

सल्ला दिला की, "अनायासें नवीन मुलींची इंग्रजी शाळा निघते आहे गांवांत; पाठवा झालें तुमच्या मुलीला तेथे."

वडिलहि म्हणाले, "कांही हरकत नाहीं. कोठे तरी दंगाच करावयाची ती मुलींच्या शाळेंत करील. कागाळ्या यायच्याच तर फक्त मुलींच्याकडून येतील."

शाळेंत आल्यापासूनहि तिचा मार्ग मोठा सीधा असे. वर्गात शक्य तेवढें गप्प राहण्याचा ती प्रयत्न करी, पण मैत्रिणींचे गट बनवून दंगा करणें, विरुद्ध गटाशीं भांडणें व प्रसंगीं मारामारीहि करणें चालूच असे. यामुळे केव्हा वर्गात अनवस्था उत्पन्न झाली व शिक्षकांनी त्याबद्दल शिक्षा केली तर ती निमूटपणें सहन करी व पुनः आपल्या उद्योगाला लागे. वर्गात ज्या अभ्यासक्रमाचें महत्त्व मानलें जातें त्यांत तिचें मन कधीच रमलें नाही. अर्थात् त्यांत सरसावून पुढे जावें ही महत्त्वाकांक्षाहि उत्पन्न झाली नाही. कांही तरी कानांवर पडे; आवडलें नाही तरी कांही तरी वर्गात सांगितलेलें समजलेलें असेच व या पुंजीवर कसे तरी बेताचे मार्क मिळवीत तिची प्रगति चार इयत्तांपर्यंत येऊन ठेपली होती. घरच्या मंडळींनाहि त्याबद्दल फारसें कधी वाटत नसे. थोडीशी चौकशी कांही करीत ती वार्षिक परीक्षेच्या निकालाच्या वेळी. चौथ्या इयत्तेंत जेव्हा सोनू नापास झाली तेव्हा मात्र एकदा पालकांनी शाळेंत येऊन भेटून चौकशी केली होती. त्या वेळी आपलें शिक्षणाबद्दल स्वच्छ मत त्यांनी शिक्षकांना सांगितलें होतेंच.

'मी जी मुलीला शाळेंत पाठवितों ती पॉलिसी म्हणून; नाही तर शिक्षण हें माझें ध्येय नव्हे. मुलगी चौथींत आहे असें सांगितल्याने 'स्थळें' शोधतांना उपयोग होतो. पांचवींत आहे म्हटल्याने जास्त मदत होईल. म्हणून तर मी दरमहा दोन रुपये फी व इतर वर खर्च करून तिला शाळेंत पाठवितों. पाहा बुवा! तुमचेंच महिन्याच्या फीचें नुकसान करून घ्यावयाचें असलें तर!' अशा तऱ्हेने जणु आपणच शाळेच्या चालकांना फार योग्य सवलती देत आहोंत अशा भावनेने त्यांनी आपल्या भाषणाचा समारोप केला होता.

सोनूचा एक मात्र मोठा गुण व तो म्हणजे सरळपणा. दंगा करावयाचा तो उघड. मास्तरांचा राग आला तरी उघड. खाली मान घालून तोंडांतल्या तोंडांत पुटपुटणें वगैरे तिला कधीच जमलें नाहीं. 'ए, चला ग, चला लवकर खेळायला. घंटा झाल्यावर कसल्या वर्गात बसतां!' असे मास्तर वर्गात

असतां ती मास्तरांना ऐकूं जाईल असें मोठ्याने मुलींना सांगे किंवा इतरहि शक्य त्या तऱ्हेने शिक्षक, शिक्षण व अभ्यास यांबद्दल आपली तुच्छता व्यक्त करण्याचा प्रसंग सोडीत नसे.

पण कोणत्या व्यक्तीला कोणत्या गोष्टीने धक्का बसेल, हें पुष्कळदा कळत नाही म्हणतातना तसें झालें तिच्याहि बाबतींत. शाळेंतील ज्ञानाभिलाषिणी सभेची बैठक होती. सर्व विद्यार्थिनी व शिक्षक सभागृहांत जमले होते. सभेच्या कामास सुरुवात झाली. त्या दिवशीचे सभेचे अध्यक्ष येऊन बसले व त्यांच्या-पुढे भाषण करणाऱ्या मुलींच्या नांवांची यादी टाकण्यांत आली. पहिलेंच नांव आपल्या सोनबाचें होतें. व्यवस्थित व सुसंगत भाषण तिला करतां येईल, अशी इतर कोणाची अपेक्षा नव्हती व स्वतः तिचीहि नव्हती. किंबहुना तिची इच्छा विचारली असती, तर तिने तें काम कधीच पत्करलें नसतें. पण सभेंत बोलणें आवश्यक व हजिरीपटावरील नांवामध्ये अनुक्रमाने तिचें नांव आलें म्हणून घातलें गेलें एवढेंच. सभापति दांडेकर मास्तर यांनी प्रथम सभेची सूचना-पत्रिका वाचून दाखविली. 'आजच्या सभेचा विषय 'आदर्श विद्यार्थी' हा आहे.' मुख्य वक्त्या अमुक-अमुक इ. सोनु कांहीतरी सबब काढून आयत्या वेळीं गुंगारा द्यावयाची; पण स्वारी त्या दिवशीं उपस्थित होती व नांव उच्चारल्याबरोबर हातांत वहींतून फाडलेला कागदाचा एक चिटोरा, पिंजारलेले केस, मधल्या सुटींत खेळतांना मारलेला लुगड्याचा काचा, अशा पवित्र्यांत स्वारी टेबलापाशीं येऊन उभी राहिली. मंडईतील हेलकरीण वाटायला हातांत हारा तेवढा कमी. तें ध्यान पाहिल्या-बरोबर 'आता ही का बोलणार?' असें शेजारीं बसलेल्या मास्तरांचे उद्गार ऐकतांच दांडेकर मास्तरांना अवधान न राहून तोंडावर हात ठेवून ते एकदम मोठ्याने हसले. मुलींनाहि मौज वाटत होती. पण त्या जरा दबल्या होत्या. आता मास्तरच मोठ्याने हसल्यावर त्यांचा मार्ग मोकळा झाला व दोनचार मिनिटें सर्वच सभागृह हसूं लागलें. आपलें जरा चुकलेंच, असें दांडेकर मास्तरांनाहि वाटलें व त्यांनी लागलीच सर्वांना गप्प राहण्याबद्दल सुचविलें. पण आता 'सोनबा'कडून भाषण होणें अशक्य होतें. आधीच ती कधी नाही ती चुकून सभेला आली व त्यांत हा प्रकार. मुकाट्याने ती परत जागेवर जाऊन बसली व सभापतींनीहि मग तिला आग्रह न करतां सभेचें काम सुरू केलें.

गोष्ट अभावित होऊन गेली खरी. पण त्याचा कांहीतरी तिजवर परिणाम झालेला हळुहळू दिसूं लागला. वर्गांतील शिक्षकहि सांगूं लागले की, 'सोनबा हल्ली घरून वाचून येतात; निदान पुस्तक विसरून येत नाहीत.' दांडेकर मास्तरहि म्हणत, 'माझें थोडेंसें चुकलेंच, इतक्या मोठ्याने मीं हसावयास नको होतें. पण करूं काय ? तें ध्यान पाहून मला हंसूं अनावर होऊन बाहेर फुटलें. पण हल्ली ती मुलगी माझ्या तासाचा इतिहास तरी वाचून येते हो !' वर्गांतील मुली व इतर मुली यांच्याबरोबर होणारीं कडाक्याचीं भांडणेंहि कमी ऐकूं येऊं लागलीं. अर्थात् सर्वांच्या डोळ्यांत भरण्याएवढा फरक होई-पर्यंत आणखी चार महिने गेले.

आणखी कांही दिवसांनी सोनूच्या लग्नाची जारीने खटपट चालू अस-ल्याची बातमी तिच्या मैत्रिणींतून बाहेर पडली व पाठोपाठ लग्न ठरून तिथिनिश्चयहि झाल्याचें प्रकट झालें. लवकरच लग्न होणार व 'सोनोबा-गुंडोबा-दांडोबा'—हें तिच्या मैत्रिणींनी ठेवलेलें तिचें स्पेशल नांव होतें—आपल्या सासरीं जाणार व शाळा त्यांना मुकणार हें सर्वांना कळून चुकलें. आपल्या लग्नाचें आमंत्रण सोनूने तर सर्वांना दिलेच, पण आपल्या भावाकडून दांडेकर मास्तरां-सह सर्व शिक्षकांना अगत्याने बोलावलें. लग्नाच्या प्रसंगाने बनलेली सोनूची शांत व अगत्यशील वृत्ति पाहून तिच्या सर्व वर्गभगिनींनाहि आश्चर्य वाटलें. भावजयीनेहि सर्व मैत्रिणींना आग्रहपूर्वक विचारलें, "तुम्हांला कांही कमी पडलें नाही ना ? हळदकुंकू नारळ सर्व नीट मिळाले ना ? वन्संनी मला बजा-वलें आहे की, लग्नाच्या गडबडींत मला माझ्या मुलींची चौकशी करतां यायची नाही, ती तूं कर म्हणून !"

विवाहसमारंभांतून मिळालेले दोन दोन नारळ घेऊन येणाऱ्या मुली व शिक्षिका म्हणत होत्या,

'खरंच ! सोनबा नारळासारखे आहेत. वरून किती खडबडीत व कठीण असले तरी आंत गोड पाणी आहे बरं !'

यानंतर सोनूची व माझी गांठ पडली ती दहाबारा वर्षांनी. एक मुलगी कडेवर व एक मुलगी धावणारी बरोबर होती तिच्या. आपल्या आठ वर्षांच्या मुलाच्या मुंजीचें आमंत्रण द्यावयास ती आली होती. घटकाभर बसून आपल्या घरचें सर्व कुशलवृत्त तिने सांगितलें व शाळेचीहि आठवण केली. शाळेच्या गोष्टी बोलतांना ती म्हणाली, 'हल्ली दांडेकर मास्तर कोठे आहेत ? कसें काय

चाललें आहे त्यांचें ? ठीक आहे ना ? माझी मुलगी इंग्रजी शाळेंत जाण्याजोगी झाली म्हणजे कन्याशाळेत पाठविणार आहे तिला.'

दांडेकर मास्तरहि ती शाळा सोडून आता दुसऱ्या व्यवसायांत पडले आहेत. पण कधी गांठ पडली व शाळेच्या गोष्टी निघाल्या की तेहि विचारतात, कोठे आहेत हो ते सोनबा ? ठीक चाललें आहे ना तिचें ?"



## मै ना रा णी : : : ५

वर्गांत पहिल्याच बाकावर ती बसे व मनमोकळी हसे. हसली की तिच्या गालावर गोड खळी दिसे. 'काबुलीवाला' ही लघुकथा शिकवितांना पुष्कळदा मनांत येई की, या आमच्या मैनीवरून का टागोरांना त्यांची 'मिनी' सुचली. सावळी कांति पण नाक डोळे तरतरीत व चेहऱ्यावर आणि चालींतहि अशी एक प्रकारची ऐट की, मैनाराणी हें नांव तिला शोभून दिसे किंबहुना तिच्या या ऐटदार घाटणीवरूनच तिला घरची मंडळी मैनाराणी म्हणूं लागली. तिचा आवाज मैनेसारखा गोड व चढा. गाऊं लागली की ऐकणारा डोलूं लागावयाचाच. त्यामुळे एकदा मोठी फसगत झाली. शाळा पाहावयास आलेल्या बाईंनी हिचें गाणें दुरून ऐकलें. इतक्यांत गाण्याच्या वर्गांतून हिची बहीण बाहेर आली. हीच मुलगी गाणारी असें समजून त्यांनी खूप होऊन एका 'स्थळा'साठी त्या बहिणीची शिफारस केली. कर्मधर्मसंयोगाने तो विवाहसंबंध घडून आला; मागाहून त्या पाहुण्या बाईंना कळलें की गोड गळ्याची मुलगी ती दुसरीच होती.

या वयांत साधारणपणें इतर मुलींत दिसून न येणारे गुण तिच्यांत दिसत. टापटीपी व व्यवस्थितपणा तिच्यांत विशेष असे. पुस्तकें, वह्या, त्यांवर घातलेलीं नांवें—कशीं रेखीव. कपडालत्ता झुळझुळीत ठेवणें तिला आवडे व त्यामुळे साधीहि साडी तिच्या अंगावर उठून दिसे. कोणतीहि गोष्ट पाहिल्याबरोबर अगर परिस्थिति दिसल्याबरोबर आपण काय करावें, हा निर्णय तिला तात्काळ घेतां येई. पण या सर्व स्वाभाविक गुणांचा उपयोग कोणतीहि गोष्ट यशस्वी

करण्यापेक्षा त्यांच्या मदतीने जबाबदारी अगर त्रास यांतून स्वतःची सुटका करून घेण्याकडे ती करी.

सहामाहीच्या परीक्षेत एकदा तिला कमी मार्क पडले व कमी मार्क पडलेल्या मुलींच्यासाठी एखादा जास्त तास वाढवून त्यांचे कच्चे विषय पुरे करावे, असा विचार शिक्षक मंडळी करूं लागली. कारण मुलींचें वर्ष बुडूं नये असे त्यांना वाटे. ही जास्त तासाच्या शिकवणुकीची कल्पना इतर मुलींना आवडून, त्यांनी तासास येण्याची उत्सुकता दर्शविली. पण मैनाराणीने विचार केला की कोण आणखी एक तास दगदग वाढविते. तिने सरळ जाऊन सांगितलें, "कां माझ्यासाठी तुम्हांला दगदग ?' माझ्याच्याने अभ्यास याहून जास्त व्हावयाचा नाही. मला पुढच्या वर्षी याच वर्गात राहावयाचें आहे. तेव्हा मला त्या वर्गाला न येण्याची परवानगी द्या." आणि प्रत्यक्ष त्याच वर्गांत राहावयाचा प्रसंग आल्यावर ती तितक्याच आनंदाने मागच्या वर्गांत राहिली. जिवाला कोणतीहि गोष्ट लावून न घेतां एक प्रकारची बेफिकीर वागणूक तिची असे व म्हणूनच तिला घरांत 'राणीसाहेब' म्हणत.

आवाज गोड असल्यामुळे घरांत आई-वडिलांनीहि तिच्यासाठी गाण्याच्या खास शिक्षणाची सोय केली होती. थोरली बहीण पेटी वाजवी, भाऊ तबल्याचा ठेका धरी व त्यांच्या साथीसह मैनाराणी गाऊं लागली म्हणजे गाण्याला चांगला रंग भरे. एकदा परगांवचे एक पाहुणे आले व त्यांनी तासभर हा जलसा ऐकून सांगितलें की, 'Imitation is the best way of appreciation.' मी गांवीं गेलों की प्रथम गवई ठेवून माझ्या मुलींना अशा तयार करतों. पण इतकी स्वरसंपत्ति असूनहि वार्षिक चढाओढींत गाण्याचें बक्षिस तिच्या सहव्यवसायी मैत्रीणीलाच मिळालें. कारण, विशेष मेहनतीचा कंटाळा व महत्त्वाकांक्षेचा अभाव. गाणें ऐकल्याबरोबर जरी गोड वाटलें तरी परीक्षक तालहि पाहतात व तालबद्धता येण्यासाठी अभ्यासपूर्वक प्रयत्न करावा लागतो तो करतो कोण ? "सकाळीं एक तास लवकर उठावयाचें व संध्याकाळचा मोकळा वेळ आणखी कटकट करीत बसावयाचें. जाईनां त्यापेक्षा बक्षीस. पुढे तरी तें कपाटांतच राहावयाचें ना ?" अशी तिची विचारसरणी.

एकदा त्यांच्या बहिण-भावडांत मोठा वाद झाला.

"ए श्रीधर" वसंत जोरानें म्हणत होता. "यांच्या गप्पा एकदा चालल्या

होत्या रे. आमचे साठेमास्तर अस्सं म्हणाले व आमचे साठेमास्तर तस्सं म्हणाले. मीं म्हटलं कोण साठेमास्तर ? पाहतों तों आपल्या शाळेंतून कसा-तरी बाहेर पडून दोन वर्षें 'इंटर'ला अडलेला आपला 'सद्या'! आमच्या शाळेंत त्याला कोणी धड 'अहो सदू' का न म्हणेना ! यांचे झाले ते साठेमास्तर."

"वा ! वा !" मैनाराणी 'यावरून काय शाळेची किंमत होते ?' सगळे मास्तर लहानपणीं मुलगे असतातच. नापासही होतात व बोलूनही घेतात. लहानपणीं सगळ्यानांच अरेतुरे म्हणतात, "अरे वसंत, श्रीधर ! तुमचे देवधरमास्तर तर अगदी एवढे संस्थापक ना !" विमलने भर घातली. "पण ते तर लहानपणींच शाळा सोडून नाटककंपनीत पळून गेले होते. आम्हीं वाचलें आहे त्याचें चरित्र प्रभातमंडळांत. बोला आतां."

आणि असा वाद नेहमीच होई तसा आजही झाला होता. मुलांचें म्हणणें त्यांचें न्यू स्कूल चांगलें तर मुलींचें म्हणणें त्यांची कन्याशाळा चांगली. मुलांच्या नेहमीच्या पद्धतीने परस्परांच्या शाळेतील मास्तरांच्याबद्दल तुच्छता, शिक्षणक्रमाबद्दल अवहेलना व शेवटी शाब्दिक मुद्दे संपल्यावर एकमेकांला वेडावून दाखविणें येथपर्यंत मजल गेली. मैनाराणीनेहि त्यांत प्रामुख्याने भाग घेतला होता. शेवटी आईला मध्ये पडून त्या भांडणाचा समेट– म्हणजे मुलांना माडीवर अभ्यासासाठी पाठवून देणें व मुलींना खाली माजघरांत भाजी निवडावयास बसविणें– करावा लागला. मग आपसांत गोष्टी चालू झाल्या. मैनाराणी म्हणाली, "मी खरं सांगू का ? ते काय म्हणत होते तें मला कांहीच कळलें नाहीं. पण मुलाशीं वाद करावयाचा व आपली बाजू उचलून धरावयाची म्हणून मी भांडलें येवढेंच."

एकदा तिची मावशी अचानक पाहुणी आली. अपरात्रीची वेळ. दोन वाजता रात्री गाडी आली. तेव्हा आईने मुलींच्या अंथरुणावरच थोडी मोकळी जागा करून मावशीस झोपण्याची सोय केली. सकाळी मैना घरांत चहा घ्यावयास येते तों समोर मावशी बसलेल्या.

"अगबाई मावशी ! आणि तुम्ही केव्हा आलांत ?"

मावशी हसून म्हणाल्या, "तुला माहीत नाही का ? मी रात्री आलें व तुझ्या शेजारीच झोपलें होतें की ?"

"तरी मला वाटलेंच रात्री आपल्याजवळ कोणी आहे म्हणून" मैनाराणी म्हणाली.

"मग तूं तेव्हां नाही पाहिलंस कोण आहे तें ?" बहिणीनें प्रश्न केला.

"मला आला होता कंटाळा. मीं म्हटलं जें कोण असेल तें सकाळीं दिसेल."

शेजारचा मधु आणि लीला दोघें कॉलेजांत जात. त्यांचा संवाद एकदा तिने ऐकला. लीला कॉलेजांत नवीनच जाऊं लागली होती. त्यामुळे अजून तिची भीति मोडली नव्हती. मधु आता सरावला होता.

"ए मधु, जेव किरे लवकर" ती केविलवाणेपणें म्हणे, "मग कॉलेजांत पोचायला उशीर होतो." आपला हात जास्तच थंडावून मधु म्हणे, "हें बघ लीले, कॉलेजांत जाऊन परीक्षा द्यावयाची कशाला ? तर नोकरी मिळवायला. नोकरी कशासाठी हवी ? तर जेवावयाला हवें म्हणून. अग, ज्याच्यासाठी कॉलेजांत जायचें तेंच का बुडवावयाचें ? आई, थोडी आणखी पोळी वाढ ग !"

लिली रडकुंडीला येऊन म्हणे, "अरे मध्या ! मग तास सुरू होतो. सर वर्गांत उशीरा येऊं नका म्हणतात."

"मग जायचंच कशाला उशीरा वर्गांत ? पुढच्याच तासाला एकदम गेलें म्हणजे संपलें. काय तुम्ही पोरी प्रोफेसरांना भितां कोणास माहीत."

मधूची विचारपद्धति मैनाराणीला पटली. कॉलेजच्या विद्यार्थ्यांप्रमाणे सबंध तासाला अगर कॉलेजला बुट्टी देणें तिला घरच्या शिस्तीमुळे शक्य नव्हतें. पण थोडा उशीर होतोसा वाटल्यास इतर बहिणी आणि मैत्रिणींप्रमाणे जिवाची धावपळ ती करीत नसे. फार तर काय, पांच मिनिटें उशीर होईल; प्रार्थनेची पंधरा मिनिटें जातील व घंटेचे मार्क बुडतील असें तिला वाटे. मैत्रिणी पुष्कळदा म्हणत, "अग मैना, असे थोड्यासाठी कां मार्क बुडवितेस ? शिक्षक रागावतात अशाने."

मैना शांतपणें म्हणे, "मार्क कशासाठी मिळवावयाचे ? नंबर वर येण्यासाठी. वर नंबर आणायचा कशासाठी ? सर्वांनी चांगलें म्हणण्यासाठी. सगळ्यांचाच वर नंबर कसा येणार ? पास झालें म्हणजे झालें. आणि काय ग, तुम्हांला एवढें शिक्षकांच्या रागलोभाचें भय वाटतें ? प्रत्येक मुलीला शिक्षकांनी चांगलें म्हटलेंच पाहिजे, असें कोणीं सांगितलें आहे ?"

एकदा तिला परीक्षेच्या निमित्ताने पुण्याच्या वसतिगृहांत राहण्याचा प्रसंग आला. एके दिवशीं सिनेमाला जावयाचा बूट तिच्या मैत्रिणींत निघाला; पण संध्याकाळी जावयाची परवानगी आयत्या वेळी मिळणार कशी ! तेव्हा त्या

दिवशी त्या प्रश्नाची भवति न भवति होऊन तो बेन तितकाच राहिला. संध्याकाळी मैनाराणी उशीरा परत आली व मैत्रिणींना सांगूं लागली, " मी सिनेमा पाहून आले. "

" अग, पण गेलीस कशी ? "

" मीं विचार केला की, सिनेमा तर पाहावासा वाटतो. विचारावयाला जाऊन रेक्टरनी नको म्हटलें की जाणें बरें नाही. नगरला हा सिनेमा येईपर्यंत थांबावयाचें म्हणजे आणखी वर्षभर थांबावयाचें. त्यापेक्षा आजच थेट जाऊन यावें. फार तर बोलतील; दंड करतील. क्षमा मागूं तितकीच वेळ आली तर ! 'चुकलें' म्हटल्यावर काय क्षमा करणार नाहीत ? "



## श्री ध र : : : ६

" Born of the people, trusted by the people he must work and die for the people."

वक्त्याने मोठ्या आवेशाने हातवारे करीत आपलें भाषण संपविलें व सभागृहांत टाळ्यांचा मोठा कडकडाट झाला. आपली स्तुति ऐकून थोडेंसें औचित्य सोडूनहि लोकमान्यांनी टाळ्या वाजविल्या. वक्त्याने केलेलें आपलें वाङ्मयचौर्य ओळखूनहि बॅप्टिस्टाकाकांनी वक्त्यावर न रागावतां अगर उपहासहि न करता वक्त्याची पाठच थोपटली व सभागृहांतील एका श्रोत्याने तर एकदम व्यासपीठाजवळ जाऊन वक्त्याला उचलून धरलें आणि पुढें काय ? कौतुकाने गोंजारून दोन लिमलेटच्या गोळ्या दिल्या.

प्रसंग मोठा तर खराच. सभेस लोकमान्य उपस्थित होते, केळकर होते, बॅ. बॅप्टिस्टा होते; तशाच इतरहि अनेक उल्लेखनीय व्यक्ति होत्या. पण ही सभा मुंबईंत खरी पण आझादमैदानावर भरली नव्हती, तर सरदारगृहांतील एका खोलींत होती. लोकमान्यआदि प्रसिद्ध पुढारी उपस्थित असले तरी ते सभेस आले नव्हते, तर सकाळी एकत्र जमून चहा घेत होते; वक्ता तेथे आला असला तरी तो व्याख्यान द्यावयास आला नसून लोकमान्यांना व बॅप्टिस्टाकाकांना पाहावयास मामाचे कडेवर बसून आला होता व टेबलावर उभें राहून

त्याने व्याख्यान दिलें तरी बोललेल्या वाक्याचा अर्थ त्याला कळत नव्हता. आणि व्याख्यानाचा हेतु लोकशिक्षणाचा नसून पेपरमिंटाच्या गोळ्या मिळविण्याचा होता. लोकमान्य टिळक, केळकरआदि मंडळी इंग्लंडहून परत आली तेव्हा सरदारगृहांत उतरली होती. तेथे त्यांची घरची मंडळीहि पुण्याहून भेटण्यास आली होती व त्यांत आपल्या आजोबांना म्हणजे केळकरांना भेटावयास श्रीधरलाहि घरच्या मंडळीनी बरोबर आणले होतें. मुंबईस पोचल्यावर त्याचा विठुमामा त्याला आजोबांचेकडे घेऊन गेला तेव्हा त्याने सांगितलें होतें, 'मी तुला टिळक दाखवीन, बॅप्टिस्टाकाका दाखवीन पण तूं आपलें भाषण तेथे म्हणून दाखविलें पाहिजे. म्हणजे बॅप्टिस्टाकाका म्हणतील की कोण हा मुलगा आपल्यासारखें बोलतो आहे, आणि टिळकांना पाहण्याच्या हौसेनें व पेपरमिंटाच्या गोळ्यासाटीहि त्याने ते कबूल केलें होतें. बॅ. बॅप्टिस्टा यांनी नुकतेच एका व्याख्यानांत Born of the people इ. लोकमान्यांचें केलेलें हें वर्णन त्या वेळी फार लोकप्रिय होते व श्रीधरच्या मामांनी त्याचेकडून तें पाठ करून घेतलें होते.

लहानपणापासून पठणशक्ति त्याची चांगली. एकपाठी म्हटलें तरी चालेल आणि त्याचे सर्व मामा व आक्काहि त्याचेकडून कांही ना कांही पाठ करवून व साभिनय म्हणवून घेत. तोतयाच्या बंडांतील नाना फडणिसाच्या पात्राप्रमाणे तो उभा राही व एक हात उंचावून म्हणे, "भवितव्यते! धन्य आहे तुझ्या अघटितघटनापटुत्वाची" पण शेवटचा लांबलचक व त्याचे हिशेबी अर्थहीन समास उच्चारतांना व त्याच वेळी उंचावलेला हात खाली आणतांना त्याची धांदल होऊन एकाद वेळ हात खाली यावयाचा विसरे अगर 'घटनापटुत्वाची' ऐवजी 'पटनाघटुत्वाची' अशी शब्दांची उलटापालट होई. शेजारच्या आत्याबाई मुळी म्हणतच, "एक पाळण्यांतला पोपट व एक पिंजऱ्यांतला पोपट." आत्याबाईंच्या घरांत मूलबाळ नसल्याने त्यांचें वात्सल्य पोपटाचे बाबतींत उसळून येई व बराचसा त्यांचा वेळ त्याचें कौतुक करण्यांत जाई. आत्याबाई पोपटाला हातावर बसवून पोपटाशी बोलत बोलत त्याला एक एक डाळिंबाचा दाणा अगर पेरूची फोड खाऊं घालत व ती मौज पाहण्यास जेवत जेवत आईचे अगर आजीचे कडेवरून श्रीधर येई. पोपटाकडे पहात पहात व आत्याबाईंनी दिलेल्या पेरूच्या आनंदांत त्याचे घास संपत. आत्याबाई म्हणत, तूं आणखी

एक श्लोक म्हण मग आणखी एक पेरूची फोड देईन आणि मग तो 'धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे' म्हणूं लागे. डाव्या हातावर उजव्या हाताची मूठ आपटून पुढे तो म्हणे, 'आमचे एक प्रिन्सिपाल् होते.' इतक्यांत छोट्या छबूला छप्पापाणी खेळण्याची लहर येई व प्रार्थनेचें छप्पापाण्याच्या डावांत रूपांतर होई. हिंगण्याच्या संमेलनप्रसंगी सर्व खेळांत तो भाग घेई व गोष्टी सांगून बक्षिसें मिळवी. नाटकांतही काम करण्याची त्याला हौस. नाचामध्यें पीतांबर नेसून मुरलीधराप्रमाणे मुरली वाजवीत उभें राहणें हा तर त्याला आपला हक्क वाटे. आणि प्रथम जरी मोठ्या मुलींच्या बोर्डिंगांत तो कसा राहील अशी काळजी होती तरी पुढे तो बोर्डिंग हेंच आपलें घर समजूं लागला.

पण कांही दिवसांनी तो पुण्यास आजीजवळ राहूं लागला. तिघाही मामांचा तो अतिशय आवडता; पण त्यांतल्यात्यांत विठुमामावर तो खूप असे. कारण लहान मुलांना खेळविण्याची कला विठुमामाला अवगत होती. आण्णामामा बापूमामा खेळवीत; पण तितकेच रडवीतही. त्यामुळे विठुमामा त्याचा आवडता मामा होता. सातारला आजोबांनी विचारलें की, श्रीधर तुझा कोणता मामा तुला खेळवतो' म्हणजे तो सांगे की, "आण्णामामा सटकावतो व विठुमामा खुलवतो नि बापुमामा झुलवतो." पुण्यास प्रथम तो आक्काला सोडून राहण्यास तयार नव्हता. पण जेव्हा सर्व मामांनीं त्याला सांगितलें की, 'अरे बायकांच्या शाळेंत कसला जातोस? आपण पुरुष आपली शाळा वेगळी. आम्ही कुठे जातों त्या हिंगण्याच्या बायकी शाळेंत! तेव्हापासून त्याला अभिमान वाटे की आपण पुरुष हिंगण्यास केव्हां गेला तर तो पाहुण्यासारखा जाई व कुणीं कारण विचारलें तर सांगे की, "आपण नाही बायकांच्या शाळेंत जात." असाच तो एका संमेलनाला आला तेव्हा सर्वांनी त्याला भंडावून सोडलें. आक्काच्या मैत्रिणी म्हणत "काय पुरुष! आमच्या बायकांच्या शाळेंत कशाला आला? तेथील मावशीही तेंच विचारीत, काकूही तेंच विचारीत. तेव्हा त्याला इतकें वाटलें नाही. पण दादा, नाना, मायदेव सर्वच विचारूं लागले, 'अहो पुरुष! तुम्ही बायकांच्या शाळेंत कशाला आलांत?' तेव्हा त्याला प्रश्न पडला की यांनी सुद्धा असें कां म्हणावें. तो हळूच म्हणाला, "मग तुम्ही इथें नाही का येत?"

घरांत एकच लहान मूल. पणजीचा पहिलाच पणतु, आजाआजीचा पहिलाच नातु, आईचा एकुलता एक मुलगा, तिन्ही मामांत एकच व पहि-

लाच भाचा कां कौतुक होऊं नये त्याचें ? व तोहि लहानपणापासून नाजुक हसरा खेळकर बोलका असल्याने साऱ्यांच्या हातावरच वाढला त्याची आक्का हिंगण्यास शिकत असतां तो एकदोन वर्षे तेथे होता. तेथें लहान मुलगा म्हणून कौतुकच होई. आश्रमाच्या व विद्यालयाच्या लहान मुला-मुलींत तो मिसळे व खेळांत भाग घेई. खेळतां खेळतां मधल्या चौकांत तो प्रार्थना घेई व दादा दिवेकरांचेप्रमाणे मांडी घालून, डोळे मिटून श्लोक म्हणे व पुढे प्रवचनाला सुरवात करी.

"आम्ही बायका आहोंत" नाना हसत म्हणाले, "म्हणून तर आम्ही येथे, खरं ना हें."

पण त्याला तें खरे वाटेना. बराच वेळ विचार करून तो हळूच म्हणाला, अंहं ! तुम्ही नाही बायका. तुमच्या ओठावर शेंडी आहे ती."

पुण्यास घरामध्ये बाकी सर्व मुलें म्हणजे मामा लोक मोठे हायस्कुलांत जाणारे व लहान बालवर्गांत जाणारा एकटाच. शेजारीपाजारी मुलांबरोबर तो जरी खेळे तरी घरांतला सर्व वेळ त्याचा या मोठ्या मुलांत जाई. जेवतांना सर्वांच्या गप्पागोष्टींना भर येई. शाळेंतील गप्पा—विशेषतः मास्तरांच्या निघत. वर्तमानपत्रांतील राजकारणाच्या गोष्टी व वाद निघत ते सर्व त्याच्या कानीं पडत. बऱ्याचशा गोष्टींचा अर्थ कळला नाही तरी शब्दसमूह व वाक्यें त्याच्या लक्षांत रहात व आपल्या मनाने त्याचा तो अर्थ करी. जिज्ञासा त्याची प्रबळ. कोणताहि शब्द नवा वाटला अगर गोष्ट समजली नाही तर तो विचारून पुरें पुरें करी. "कवणें तुज गांजियलें सांग सुंदरी" ही ओळ एकदा कानीं पडली आणि तो अर्थ विचारूं लागला. तेव्हा त्याच्या अण्णामामाने कंटाळून त्याला अर्थ सांगितला की, 'एक होती कवणें व तिला झाली गांजी' आणि त्याला अर्थ कळलासा वाटला. तो प्रश्नही मोठे वेचक विचारी. सकाळी आलेला केसरी आजोबा वाचूं लागत तेव्हा तो विचारी, 'कायरे आण्णामामा तात्या केसरी लिहितात ना ! मग पुन्हा ते वाचतात कशाला ?" देवघरांतील नंदादीप पाहून तो विचारी, "दिवसा दिवे लावूं नयेत नारे ! मग ताई देव-घरांत दिवसा दिवा कां ठेवते ?" महाराष्ट्रगीताच्या ओळींचा अर्थही विचारी, "आकांक्षापुढति जिथें गगन ठेंगणें" 'आकांक्षा' म्हणजे काय ? 'गगन' म्हणजे काय आणि आकांक्षेपुढे गगन ठेंगणें कसें ? आकांक्षा, गगन व ठेंगणेंपण साऱ्याच अमूर्त कल्पना, जडसृष्टीचा आधार नसलेली सगळीच

वाळुवरची इमारत. लहान मुलांच्या आकलनशक्तीला कळावी कशी? पण कांही तरी अर्थ समल्याखेरीज त्याचें समाधान होत नसे. "प्रेमभावें जीव जगीं या नटला। एकाचि रसप्याला" हें पद लोकप्रिय, सर्वांच्या तोंडीं असे. कोणी वरील ओळी म्हणत तान घेतली की तो विचारी 'प्रेम भावे' म्हणजे काय? शेवटी विठुमामाने सांगितलें, प्रेम भावे नांवाचा एक मुलगा होता. त्याने थाटमाट केला आणि एकटा जाऊन रस पिऊन आला." त्याच्या आजोबांनी इंग्लडहून त्याचे नांवचें चित्रांचें पोस्टकार्ड पाठविलें. वर पत्ता लिहिला होता, "चि. श्रीधर यास, तो आपल्या आईच्या, आजीच्या किंवा पणजीच्या मांडीवर बसला असतां देणें." आपल्याला पोस्टानें पत्र आल्याचा त्याला फार अभिमान वाटला व चित्रांचें मार्मिक रसग्रहण करून तो लोकांना समजावून सांगूं लागला. "काय ग्रँड सीन आहे!" तो वर्णन करी. ही नदी वाहते आहे. हा लकडीपूल आहे. पलीकडे प्रेत जळतें आहे." सर्व मंडळी कां हसूं लागत हें त्याला कळत नसे. एक लहानसा ओढा त्यावर एक लाकडी पूल व पलीकडे शेतांत शेकोटी पेटलेली असें चित्र होतें. पण पुण्यास मामाच्या कडेवरून फर्ग्यूसन कॉलेजकडे फिरावयास जाणाऱ्या मुलाला याहून कोणतें सादृश्य आठवावें?

आता तो जास्त मोठा होऊन मराठी दुसरीपर्यंत आला होता व पुण्याच्या ऐवजी साताऱ्च्या मराठी शाळेंत जात होता. सहजच अर्थहीन शब्दसमूह उपयोगांत आणणें कमी झालें होतें. पण कोणतीही गोष्ट करतांना लहानशा गोष्टीचें मोठ्या माणसांच्या भाषेने वर्णन करणें अजून गेलें नव्हते. त्यांच्या वर्गाचें एक हस्तलिखित मासिक निघावयाचें होतें. मास्तरांनी एक लेख लिहावयास सांगितला; आपल्या आठवणींत एकदाच केलेल्या माळशिरसच्या प्रवासाचें वर्णन त्याने लिहिलें होतें व तेथें नदीवर आंघोळ करतांना पाय घसरून आपण कसे पडलों तेंही सांगितलें होतें. लेखाचा मथळा 'माझें आत्मचरित्र' असा देऊन खाली प्रकरण १ लें 'पाय घसरला' असें लिहिलें होतें. मास्तरांनी लेखाचा स्वीकार तर केलाच पण संपादकीय म्हणून लिहिलें होतें की आमच्या हस्तलिखित मासिकांत आम्ही एक 'आत्मचरित्र' हि प्रसिद्ध करीत आहोंत आणि प्रकरणाच्या शेवटी टीप दिली होती की, "लेखकाचें पुढील चरित्र घडल्यानंतर देण्यांत येईल." सातारला आल्यावर मात्र तो एकटा नसून त्याच्याच बरोबरीच्या भावंडांत आला होता. वसंत,

राजा, लीला, मनी, विमल इत्यादि सर्वांचें बालमंडळच तेथें होतें. बरोबरीच्या मुलें; तेव्हां एकमेकांच्या खोड्या काढणें, भांडणें, अबोलेहि होत.

एकदा आक्काच्या लक्षांत आलं की चारपांच दिवस रोज श्रीधर मागचा भात घेत नसे. 'अरे तुला भात कां नको' आक्का विचारी.

" मला नको भात."

'तुला भूक कमी कां लागते ? बरें नाही का वाटत ?' आक्काहि सारखें विचारूं लागली.

" भूक नाही असं नाही. पण मला जेवायला वेळ लागतो व मग मनुताई, लीलाताई कसं करतात. आक्कानं एकदा लीला-मनूकडे पाहिलें. पण आम्ही कुठं काय करतों असा साळसूद चेहरा करून त्या बसल्या होत्या. त्याहि कांही कमी नव्हत्या. जेवणानंतरची आवरासावर मुली करीत. श्रीधर उशीरापर्यंत जेवत बसला की त्याच्या पानाकडे टक लावून पहात बसत व हसत; हा भिचिमिची जेवतो म्हणून आम्हांला काम आवरायला उशीर होतो. इ. व आणखी कितीतरी अर्थ त्यांत असत, पण लहानमुलांचे संकेत मोठ्या माणसांना कळावे कसे ! आक्का उलट श्रीधरला रागावली. " मग हसल्या म्हणून ? आक्का रागाने म्हणे, " त्या हसतात म्हणून तूं काय रोज उपाशी राहाणार ? लक्ष देऊं नकोस त्यांच्या हसण्याकडे !

पण बरोबरीच्या माणसांच्या हसण्याबघण्याकडे दुर्लक्ष करणें मोठ्यांनाही कठीण जातं तेथे लहानांना तरी कसें जमावें ? ह्या आक्काला सर्व कसें समजावून सांगावें याचा त्याला मोठा प्रश्न पडला. शेवटी शब्दांचे सर्व सामर्थ्य एकवटून अगदी कळवळून तो म्हणाला, " अग आक्का, या लीलाताई, मनुताई दोघीजणी दोहींकडून पानाकडे रोखून टक लावून पाहूं लागल्या म्हणजे हृदयाला काय होतं याची कल्पना तुला येणार नाही."



## बा व ळी : : : ७

बुद्धिमान् होती ती. सर्व उदाहरणें बिनचूक करून गणितांत पैकीच्या पैकी मार्क मिळवी. लेखन शुद्ध व अक्षर वळणदार काढी. इतिहासांतील गोष्टी व सनावळी भराभर सांगे. पाठांतरहि तिचें चांगलें. कविता तर राहोच, पण

पाहिजे तो धडाहि तोंडपाठ म्हणून दाखविण्याची तिची तयारी असे. वर्गांत कोणत्याहि विषयांत ती पहिली येई. पण इतकें सर्व असून तिची प्रसिद्धि बुद्धिमत्त्वापेक्षा बावळटपणांतच जास्त होती. वत्सला हे नांव मागे पडून 'बावळी' हेच तिचें नांव आता लोकमान्य झालें होतें व त्याला कारणहि तसेंच घडलें होतें.

ती नुकतीच शाळेंत येऊं लागली होती. मराठी विषय वर्गांत चालू होता व एका कवितेचा अर्थ कृष्णाताई मुलींना समजावून सांगत होत्या. प्रश्नाचें उत्तर द्यावयास वत्सला मानेनेच नकार देऊं लागली म्हणून ताईंचें तिजकडे जास्त लक्ष गेलें. तिच्या तोंडांत आंवळा असावा; शिवाय हातांतहि अर्धा होताच. ताईंनीही शिक्षकाचें काम करावयास नवीनच सुरवात केली होती. त्यांनी असें वाचलें होतें की, 'विद्यार्थ्यास त्याच्या चुकीबद्दल वाक्ताडन करूं नये. त्याचा तेजोभंग होतो. नुसती अप्रत्यक्ष सूचना द्यावी.' त्यामुळे त्यांनी कांहीच न बोलतां तिच्या जवळ जाऊन तिच्या हातांतील आवळा मागून घेतला व फेकून दिला. दुसरे दिवशी वत्सला जरा लवकरच शाळेंत आली होती. तिने पाहिलें तों कृष्णाताई ऑफिसांत एकट्याच कांही लिहीत होत्या. ती हळूच आंत गेली व त्यांच्या खुर्चीजवळ उभी राहिली. 'काय पाहिजे ? कृष्णाताई तिजकडे वळून म्हणाल्या.

'ताई, तुम्हांला एक विचारूं का ?'

'हो, विचार की.' आश्वासनपर आवाजांत ताई म्हणाल्या.

'ताई तुम्हांला आवळे हवेत का ? आमच्या घरी झाडाला पुष्कळ आले आहेत.'

रागवावें का हसावें हा ताईंना प्रश्न पडला. पण तिच्या निरागस चेहऱ्याकडे पाहतांच ती सरळपणें हें विचारते आहे हें लक्षांत आलें व त्यांनी हसून सांगितलें, " हें पहा, काल मी तुझ्या हातांतून आवळा काढून घेतला तो मला हवा होता म्हणून नव्हे, तर वर्ग चालू असतां आवळे खाऊं नयेत म्हणून. कळलें ना !'

होकारार्थी मान हलवून वत्सला बाहेर गेली व बरोबर आणलेले आवळे तिनें मुलींना वांटून टाकले.

मधल्या सुटींत सर्व शिक्षकमंडळी चहासाठी एकत्र जमली होती. कृष्णाताईंनी ही गोष्ट त्यांना सांगितली.' वयोवृद्ध ढोबळेमास्तर म्हणाले, 'ती अशीच

बावळी आहे मराठी शाळेपासून. आणि तेव्हापासून शिक्षकमंडळांत तिचें तेंच नांव रूढ झालें.

ती बावळी ठरण्यास तिच्यांत ग्रहणशक्ति नव्हती, कार्यकारणभाव न कळण्यासारखी ती मंद होती असें नव्हे; पण तिच्या शुद्धिसाडपणामुळे विचित्र गोष्टी करून ती हास्यास्पद होई. वर्गांत बसली असता ती घरीं सुट्टींत आई काय खायला देईल याचा विचार करी, व जेवावयास बसली असता वर्गांतील धडा पाठ करी. मास्तरांनी एकदा सांगितलें होतें की, जीं वाक्यें धड्यांत येतात तीं तुम्ही उपयोगांत आणावीं. ती प्रामाणिकपणें तो उपदेश ऐके व जेऊं लागतांना आईला सांगे, "Give me some rice, Mother Dear."

आई रागावून म्हणे, "पोरटे. तुझे विंग्रजी घरांत नको आणूंस. मी आहे ना एक अडाणी."

"अग पण आई," ती शांतपणें म्हणे "मास्तर म्हणतात प्रसंग येईल तेथे शब्दांचा उपयोग करा."

शाळेंत तिला घरांतील गोष्टी आठवत. घरीं आत्याबाई यावयाच्या होत्या व त्यांनी काय बक्षिस आणलें असेल, याचा ती विचार करतांना आपण वर्गांत आहोंत हें विसरून मास्तरांनाच तिने 'आत्याबाई' म्हणून हाक मारली.

'हत् बावळी,' ढोबळेमास्तर हसून म्हणाले व तेव्हापासून विद्यार्थिनींतहि तिचें नांव रूढ झालें. ड्रॉईंग काढतां काढतां एकदा का समोर ठेवलेल्या फुलांच्या डाहाळीकडे ती पाहूं लागली की, चित्र काढणें विसरे व तसेंच तोंड अर्धवट उघडें ठेवून आणि तोंडांत पेन्सिल ठेवून बसे. घंटा होई, सर्व मुली जात तेव्हा ड्रॉईंग मास्तर म्हणत, "अहो राजे! आता उठा. दुसऱ्या वर्गाच्या मुली आल्या ना!" खाली मान घालून इकडे तिकडे न पाहतां रोज ठरल्या जागीं वर्गांत जाऊन ती बसे. एकदा वर्गांच्या खोल्यांची अदलाबदल करण्यांत आली. परंतु वत्सला आपल्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणें मागच्या बाकावर एका कोपऱ्यांत जाऊन बसली. घंटा होऊन मुली वर्गांत आल्या व पुराणिकमास्तरहि तासावर येऊन त्यांनी नफ्यातोट्याचें उदाहरण सोडवावयास सांगितलें. हा गणितांतील भाग पुढच्या इयत्तेस नेमलेला असतो, हें तिला माहीत होतें. मास्तर चुकून भलतेंच उदाहरण सांगत आहेत अशीच तिची

कल्पना. 'सर', ती उठून म्हणाली, 'तुमचें पान चुकतें आहे. हा पोर्शन पुढच्या वर्षांचा आहे.

'तुम्हीच चुकून तिसऱ्या इयत्तेत येऊन बसलांत मिस् बावळे,' पुराणिकांनी हसून सांगितलें. आता तिच्या लक्षांत आलें की, भोंवताली आपल्या वर्गांतील दुसरीच्या मुली नसून तिसरीच्या आहेत.

मनांत येतांच कोणतीहि गोष्ट प्रथम करावयाची व मग काय केलें याचा विचार करावयाचा अशी तिची पद्धति होती. कवितेच्या तासाला या तिच्या गुणाला जणु बहर येई. 'डोळ्यांनी बघतों ध्वनी परिसतों कानीं पदीं चालतों' ही ओळ वाचली गेली की, ती उठून शंका विचारी की, "बाई, 'पदीं चालतों' हें ठीक, पण 'कानीं चालतों' हें काय? कानाने कसें चालायचें?" 'नलस्य दमयंती भार्या' या वाक्याचें भाषांतर करण्याचा एकदा प्रसंग तिजवर आला होता. "The name of a queen is the wife of the name of a king", असें भाषांतर तिने केलें होतें व शिक्षकांनी चूक धरल्याबद्दल "मी पुस्तक काढून दाखवितें सर, माझें भाषांतर बरोबर आहे का नाही," असें म्हणून पुस्तक काढून तिने दाखविलें होतें. याच महिन्याला नळदमयंतीच्या प्रश्नावर तिला मराठी पेपरांत very good शेरा होता म्हणे.

वर्गांतील मुलीहि तिच्या गुणाचा भरपूर फायदा घेत. एखाद्या दिवशी निबंध लिहून झाले नसले, तर मुली म्हणत 'वत्सला, आज बाईंना मराठीच्या तासाला घड्यांची उजळणी घ्यायला सांग ना!' बाईंनी ऐकलें तर ठीकच, नाहीतर वत्सला बावळी आहेच बोलून घ्यावयाला. पण तिच्या बावळेपणाने एक गोष्ट तिने मिळविली होती की, शिक्षक तिला हसत, चेष्टा करीत; पण कोणी रागावत नसत.

'दिसे ठेंगणी मूर्ति ही बावळीशी' हें बहिर्जी नाईकाचें वर्णन सुरू होतांच मुली कविता म्हणतांना तिजकडे डोळे रोखून म्हणत व तिला चिडवीत. पण मिस् केळकरांनीच एकदा तिची बाजू सावरली. सुधाने पहिली कविता म्हणतांच मिस् केळकरांनी तिला पुढे म्हणून दाखविलें,

"जरी मानिती लोक हें रूप भोळें।
तरी न्याळिती शत्रुला तीव्र डोळे।

हुशारींत ऐसा नसे अन्य कोणी।
निघे दौड चाले जसें काय पाणी।–

बरं का, सुधाताई."

तेव्हापासून मिस् केळकर यांच्याबद्दल तिचा विश्वास फार वाढला व एक कविता लिहून 'बालिकादर्शा'त देण्यासाठी ती त्यांच्याकडे घेऊन गेली. बाईंनी कविता वाचली, पण तींतून कांही अर्थच निघत नव्हता. "वत्सला," मिस् केळकर म्हणाल्या, "अग पण तुझ्या ह्या ओळींचा अर्थ काय?"

"हें पहा बाई! मी आधी कविता लिहून आणली आहे. त्याचा अर्थ काय होतो, तें मी मागाहून ठरवणार आहें."

विनायकांची 'परा पूजा' कविता वर्गांत चालू होती. शेवटच्या ओळीपर्यंत कवितेचें स्पष्टीकरण झालें होतें. मिस् केळकरांनी शेवटच्या ओळी वाचल्या,

येइल तैशी करितां सेवा, गोड करुनि घ्यावी।
पुण्यपदाची जोड वत्सला! विनायका द्यावी॥"

"अर्थ करा वत्सलाबाई" मिस् केळकर म्हणाल्या.

"वत्सलेला विनायकाला द्यावी–" सर्व वर्ग एकदम कां हसूं लागला हैं कधीच तिच्या लक्षांत आलें नाही.



## जाईजुई : : १८

त्यांच्या गिरिजाकाकूने त्यांना किती तरी ओव्या व उखाणे शिकविले होते. फुगड्या खेळताना त्या उखाणा म्हणत, "आपण दोघी बहिणी बहिणी गळां घालूं वेढा। गोड गोड बोलूं जसा साखरेचा खडा।"

झोपाळ्यावर बसल्यावर त्या ओवी म्हणत,

झोपाळ्यावरी बैसूं। सारख्या साड्या नेसूं।
जोडीच्या बहिणी दिसूं। जाईजुई।
तुझा माझा मैलपणा। मैत्रपणाला काय देऊं।
एक लवंग दोघी खाऊं। बहिणीबाई।

परंतु सर्वच तथाकथित ध्येयवादाप्रमाणे खडीसाखरेसारखें गोड बोलणें

त्यांच्याने होत नसे. साखर विरघळून जाई व तोंडांत खडेच राहात. पण ते खडखडीत शब्दांचे खडे व भांडणेंच त्यांना आवडत. भांडल्याखेरीज त्यांना चैन पडत नसे, कारण त्या जोडीच्या होत्या. लोक म्हणत या आवळ्या-जावळ्या तर नाहीत ? पण त्या आवळ्याजावळ्या नसून, बरोबरीच्या अशा चुलत बहिणी होत्या. त्यांची आजी दोन गांवीं असलेल्या आपल्या दोन मुलांकडे म्हणजे आक्कामाईच्या वडिलांच्या घरीं कांही कांही दिवस राही, व दोघी नातींना आजीचा लळा असल्याने त्या आजी जिकडे जाईल तिकडे जात. दोघी सारख्या त्यामुळे खाण्याचा जिन्नस, कपडा, खेळ प्रत्येक त्यांना सारखें व निम्में निम्में हवें असे. दोघींना दोन पेरू दिलेले चालत नसत. एक कापून निम्मा करून द्यावा लागे, कारण दोन पेरूंची चव कमजास्त असेलना! नाही तर एक गुलाबी व एक पांढरा निघायचा एकाद वेळ! फार काय, आजीचीसुद्धा त्या वांटणी करीत. रात्री जेवणानंतर आजी अंथरुणावर निजे. दोघी दोहींकडे निजत व मग ती त्यांना 'रामा'ची गोष्ट सांगे. पण कोणत्याहि कुशीवर आजीने वळलेलें त्यांना खपत नसे. कारण जिच्याकडे ती वळेल तिला ती तिनकी जास्त मिळेलना! तेव्हा आजीने प्रथम आढ्याकडे पाहात निजावें, दोघींनी तिची वांटणी करावी, 'आजीचा हा हात माझा, आजीचा हा डोळा माझा' व मग गोष्टीला सुरवात होई.

भांडणें टाळण्यासाठी काका म्हणत, "नाही तुमचें जमत तर बोलतां कशाला एकमेकींशीं; दोघी दोन खोल्यांत खेळाना! एकीने बसावें आजीपाशीं व एकीने बसावें गिरिजाकाकूपाशीं!!" पण तेंहि त्यांना होत नसे. पुन्हा कांही तरी कारण काढून त्या एकमेकींशीं बोलूं लागत. मग काकांनी त्यांना एक गाणें शिकविलें, "तुझें माझें जमेना तुझ्यावांचून गमेना!!" कचेरींत जातांना काका त्यांना खेळाची वांटणी करून देत व शिवाय सांगत की, मध्ये भांडावयाची वेळ आली, तर एकमेकींच्या अंगाला हात लावावयाचा नाही व मारामारी करावयाची नाही. जें काय असेल तें तोंडाने बोला. ओटीवर दोन खांब त्या दोघींच्या नांवाने ठरवून दिलेले होते व भांडणाची वेळ आली म्हणजे त्या आपापल्या खांबाशीं जाऊन बसत व तोंडाने बोलून घेत. शिल्लक राहिलेल्या भांडणांचा निकाल संध्याकाळी काकांच्याकडून होई.

प्रत्येक गोष्टींत दोघींचा सारखेपणा असण्याबद्दल जाईचा फार कटाक्ष

असे. आजीबरोबर धुळ्याला ती काकांच्या गांवीं आली. दोन दिवसांनी आजी त्यांना घेऊन शेजारच्या घरीं दुपारी बसावयास गेली. शेजारीणबाईंना ऐकून माहीत होतें की, मामलेदारांना एक मुलगी आहे. त्या जुईकडे पाहून म्हणाल्या, 'मामलेदारांची मुलगी ना ही ? आणि ही दुसरी ?' 'ही ना !' जाईकडे पाहून आजी हसत म्हणाली, 'ही लोकांची आहे.' व त्या शेजारीणबाईंना ती पुढें म्हणाली, 'माझा मुलगा एक पुण्यास असतो त्याची ही मुलगी.'

'ही लोकांची आहे' असें सांगितल्याबद्दल घरीं आल्यावर जाईने 'तूं मला लोकांची कां म्हटलेंस ?' म्हणून रडून रडून आकांत केला व पुन्हा असें सांगावयाचें नाही असें कबूल करून घेतलें. चार दिवसांनी पुन्हा आणखी एका ठिकाणीं भेटावयास जाण्याचा प्रसंग आला. मुलींबद्दल बोलणें निघतांच जाईने पुढे होऊन त्या बाईस सांगितलें की, " हें पाहा, मी मामलेदारांचीच मुलगी आहें. पुण्यास माझें कुण्णी नाही."

एकदम पाहतांच दोघी सारख्या दिसत; आता त्यांच्यापैकी लहान कोण व मोठें कोण ? मोठा गुंतागुंतीचा प्रश्न होता तो. जाई जरा ठेंगणी व चणीनें लहान तर जुई दोन बोटें उंच व चणीनें थोराड. वय पाहावें तर जाई चार महिन्यांनी लहान. जाई धाकट्या घराण्यांतील म्हणून लहान व जुई वडील घराण्याचा मोठेपणाचा मान घेऊं शके; पण दोनहि घरांतील मंडळींनी जाईला 'आक्का' म्हणून तिचा वडीलपणा अप्रत्यक्ष कबूल केलेला. इतका घोटाळ्याचा प्रश्न जर एखाद्या संस्थेंत निघता तर स्पेशल कमिटी नेमावी लागली असती त्याच्या निर्णयासाठी. पण त्या स्वयंनिर्णयावरच विसंबत. घरांत त्यांना आक्कामाई म्हणत. पण चार महिन्यांनी आलेल्या मोठेपणाचा आक्काला फार अभिमान वाटत असे व जेथे तेथे मोठेपणाचा हक्क गाजवून घेणें ती सोडीत नसे. नमस्कार करण्याचा प्रसंग आला की आक्का म्हणे, 'कर मला नमस्कार, मी वडील आहेना !' माईला वाटे, 'मला ही वडील ! हिला कसला नमस्कार करावयाचा.' पण ती तोंडाने विरुद्ध न बोलतां मुकाट्यानें टाळाटाळी करी. कारण आक्का तापट, सदा तिचें चढाईचें धोरण व मोठेपणाची अंमलबजावणी होई विद्युत्युद्धपद्धतीने. माई शांत, सहसा दुसऱ्याच्या वाटेस न जाणारी, अशक्त; त्यामुळे जीव संभाळून राहण्याची वृत्ति. बोलाचाली संपून मारामारीपर्यंत वेळ आली की माई मुकाट्याने आक्कापुढे बसे व म्हणे, 'आक्का, मार

तुला किती मारावयाचें तें!' पण तीहि केव्हा केव्हां गनिमी काव्याने पाऊल टाकून आक्काचा पराजय करण्याचा प्रयत्न करी.

आजी एखाद वेळ कंटाळून म्हणे, "आता ।सारख्या भांडतां; पण पुढें भेटावेंसें वाटलें तर गांठीहि पडणार नाहीत बरं चार चार वर्षांत."

आणखी दोन वर्षें गेलीं, तसा दोघींच्या स्वभावांतील गुणविकास जास्त दिसूं लागला. आक्का ही तापट तर होतीच. शिवाय घरकामांत तिचें फारसें लक्ष नसे. एखादें पुस्तक सापडण्याचा अवकाश, की तें घेऊन ती कोठे तरी वाचीत बसेल. घरांत काय अडचण आहे हें कधी तिला कळावयाचें नाही. माईला जात्याच घरकामाची आवड; शिवाय समजूत व धोरण जास्त. त्यामुळे वाचावें केव्हा, आजीआईला मदत करावी केव्हा, हें तिला जास्त कळे. आक्का यांत बोलूनचालून मागसलेली. माईला ही जाणीव आली व पोरस्वभावाने ती व्यक्त करण्याची संधि ती घालवीत नसे. दोघींना पाटपाणी करावयास सांगितलें. माईने पाट मांडले; पण आक्का पुस्तक वाचतांना ताटें घ्यावयाचीं विसरली. 'ताटें मांडलीं नाहीस? येईल का तुझा काका मांडायला?' माई म्हणाली. 'येईल का तुझा काका' हा वाक्प्रचार तिने नुकताच कोठे ऐकला होता व तिला तो जोरदार वाटला होता. पण समोर आजीने तें बोलणें ऐकलें व हसून विचारलें, 'अग माई, पण ।तिचा काका म्हणजे तुझा कोण होतो?'

आणखीहि एक दोन वर्षें गेलीं व दोघी शिक्षणाच्या निमित्ताने दोन गांवीं स्थिर झाल्या. दोघींच्या स्वभावगुणाप्रमाणेच दोघींच्या वाढींतहि फरक दिसूं लागला. माई चार महिन्यांनी लहान असली तरी तीच चार बोटें जास्त उंच वाढली व माई मोठी व आक्का लहान असें लोकांना पाहिल्याबरोबर वाटूं लागलें.

बरेच दिवस झाले माईला एकदा आक्काची आठवण होऊन पत्र लिहावेंसें वाटलें. आपण कांही आक्कापेक्षा फार लहान नाही ही जाणीव अप्रत्यक्ष मनांत होतीच. तिने पत्र लिहितांना लिहिलें, 'चि. आक्कास अनेक आशीर्वाद. माझी परीक्षा जवळ आली आहे. तुझी आली असेल तरी अभ्यास नीट करीत जा.' इ. पत्र हातांत पडल्याबरोबर आक्काची मोठेपणाची कल्पना वर उसळून आली व रागाच्या भरांत वडिलांच्या टेबलावरून एक कार्ड घेऊन तिने तावडतोब एक उत्तर खरडलें. घरांत आई-वडिलांना दाखविलें तर असलें पत्र कोणी

पाठवूं देणार नाही असेंहि तिला वाटलें असावें. कारण घरांत कळूं न देतां तें पत्र ती पोस्टांत स्वतः जाऊन टाकून आली.

दोन दिवसांनी माई कार्ड वाचीत होती. " ती. माईबाई यांस, बालिके, आक्काचा त्रिकालचरणीं मस्तक ठेवून शिरसाष्टांग नमस्कार वि. वि. तूं मला आशीर्वाद लिहितेस मग आक्का तरी कशाला म्हणतेस?" पुढें लागलीच स्वतःचें शीघ्रकवित्व चालवून पत्राचा शेवट तिने केला होता—

" मोठ्या झालां माईबाई राग तुम्ही सोडा
गरिब बिचारी आक्का आली प्रेमाने बोला"

पण रीतीप्रमाणें हा गुप्त पत्रव्यवहार शेवटी घरांत सर्वांना कळावयाचा तो कळलाच. आक्कामाईचा दादा त्या सुमारास धुळ्यास सुट्टीला गेला होता. त्याने काकांच्या सांगण्यावरून आक्काच्या वडिलांस पत्र लिहून सुट्टींत सर्वांना धुळ्यास बोलाविलें होतें. त्यांतच त्याने आक्कालाहि निरोप लिहिला होता. " चि. आक्काला म्हणावें की, तूं जरी मानाने मोठी असलीस तरी चि. माई आता तुजपेक्षा खूपच उंच झाली आहे. तेव्हां तुझा मोठेपणाचा हक्क तिजवर बजावावयाचा असेल तर येतांना बरोबर एक शिडी घेऊन ये. नाही तर तुझे हात तिच्या कानापर्यंत पोचणार नाहीत!"

कालप्रवाह चालूच होता. पर्वतांत एका ठिकाणीं उगम पावणाऱ्या दोन झऱ्यांप्रमाणे त्यांचे जीवित-प्रवाह विस्तार पावून एक पूर्वाभिमुख व एक पश्चिमाभिमुख होऊन परस्परांपासून दूरदूर वाहूं लागले होते. मधून कधी आठवण आली म्हणजे वर्षसहा महिन्यांनी पत्र लिहीत. एकदा माईने लिहिलें, 'आक्का, खरी वडील तूंच नाही का? तुला नमस्कार लिहिला तर तूं आशीर्वादच देशील ना! मी आपली तुला चिडविण्याकरिता तसें लिहीत असें. तेव्हा रागावूं नको. खरी मीच लहान आहें.' आक्काने उत्तर लिहिलें, 'माई, मला तरी कोठे कळत होतें. चार महिन्यांचा मोठेपणा हा हिशेबांत का धरण्याजोगा आहे? शिवाय समजूतदारपणा नि सहनशीलता यांत तूंच मजपेक्षा जास्त नाहीस का? मोठेपणा हा प्रत्येकाला पुढे यावयाचाच असतो. पण लहानपणा मागून मिळत नाहीं. तेव्हा मीच लहान आहें.'



"ठेवल्यात हुश्शार तिसरीच्या मुली." जोरजोराने बोलणें ऐकूं येत होतें.
"नमस्कारांत बक्षीस मिळवावयाला कांही हुशारी लागत नाही."

"माहीत आहे. चौथीच्या मुलींची हुश्शारी" प्रत्युत्तर आलें. "शुद्धलेखनाच्या चढाओढींत तिसरीचीच मुलगी पहिली आली ना! आणि चौथीच्या हुश्शार मुली बसल्या होत्या खालच्या नंबरावर जाऊन; आणि म्हणे आम्ही शाळेचा लौकिक वाढविणार."

"तर! तर! चौथीच्या मुलींनी नवीन नियमाप्रमाणे शुद्धलेखन लिहिलें होतें" सुधा ओरडून सांगूं लागली. "परीक्षकांनी जुन्याच नियमाने तपासलें, त्याला मुली काय करणार? मास्तरांनी परीक्षकांशीं भांडून चौथीचा लौकिक कायम ठेवायला हवा होता."

शाळेच्या लौकिकाची इतकी काळजी व चिकित्सा करणाऱ्या या मुली आहेत तरी कोण, म्हणून मुख्याध्यापिकेने ऑफिसच्या दारांत येऊन पाहिलें. तिसरीच्या मुली व चौथीच्या मुली घरीं जाण्याच्या तयारीने पुस्तकें पिशव्या घेऊन बाहेर अंगणांत आल्या होत्या व कालच पुऱ्या झालेल्या चढाओढींच्या निकालाची चर्चा चालली होती. आधी प्रथमपासूनच तिसरींतील गट व चौथीतील गट यांचें भांडण असे; पण त्यांतून सुधेसारखा म्होरक्या चौथ्या इयत्तेच्या गटाला मिळाल्यापासून त्यांचा पक्ष फार जोरावला होता. तसे त्यांचे गट म्हणजे पांच पांच सात सात मुलींचे होते. पण संबंध वर्गांच्या वतीने त्या भांडणें भांडत. वर्गांतील बाकीच्या मुलींचे गट इतके जोरदार नसल्याने ते त्यांचे म्हणजे 'सुधा अॅण्ड को' आणि 'मथू अॅण्ड को'चे पुढारीपणास विरोध करीत नसत.

ही वादावादी रोजचीच असे. शाळा सुटली म्हणजे हे दोन्ही गट वर्गाबाहेर येत. वर्गांत झालेल्या गोष्टींची चर्चा करीत व कोणाचा वर्ग जास्त चांगला याचा काथ्याकूट करीत करीत बाहेर पडत. मधल्या चौकांतून हे गट जाऊं लागले म्हणजे भोवतालच्या चार-पांच वर्गांतच नव्हे तर रस्त्यांतून जाणाऱ्या येणाऱ्यालाहि हीं भांडणें ऐकून करमणूक वाटे. शाळेबाहेर पडल्यावर

पहिल्या कोपऱ्यापर्यंत दोनहि गट बरोबरच जात व भांडण संपलें नसल्यास तेथे थांबून राहून, भांडणांतील मुद्दे संपले म्हणजे दोनहि गट दोन रस्त्यांना वळत.

तिसरीच्या वर्गांतील मथू ही आज दोन वर्षें ओळीने शाळेंत होती. आणि धीटपणा व भांडखोरपणा यांमुळे तिसरीचें पुढारीपण तिजकडे टिकून राहिलें होतें. चौथीच्या मुलींना इतकें तोंडाळ मनुष्य अजून लाभलें नव्हतें. आपण वरच्या वर्गांतल्या असून तिसरीच्या वर्गाने काढलेल्या उण्यादुण्यांना उत्तरें देऊं शकत नाहीं असा न्यूनतागण्ड त्यांचा असे. पण या वर्षीं सुधा आल्याने त्यांची सोय झाली. महिन्या दोन महिन्यांतच तिचा तोंडाळपणा व भांडण्यांतील खंबीरपणा त्यांना कळून चुकला व चौथीचें नेतृत्व आपोआप तिजकडे गेलें.

तिचें नांव होतें नाजुक व गोडसें सुधा. पण तिच्या बोलण्यांतील ठसका, मानेचा हिसका व वागणुकींतला धसका यामुळें तिच्या नाजुक नांवाला धक्का बसून सुधाचें 'सुद्धा' झालें होतें. वर्गांत एकदा आपल्या चुकीबद्दल ती मास्तरांना सांगूं लागली, 'मास्तर मी 'बुद्धया' नव्हता अनुस्वार पुसला त्या शब्दावरचा.' मास्तर हसून म्हणाले, 'बुद्धया बरोबर काम केलेंस तर तूं 'सुद्धा' कसली !' आणि तेव्हापासून ती 'सुद्धा' झाली.

वयाच्या मानाने ती थोराड दिसे. लहानपणीं तिला बाळसें फार होतें व अजून तें कमी झालें नव्हतें. 'नाकाचा वडा, गालाचा पुडा, जिभली चाले घडाघडा' असें तिचें वर्णन तिच्या घरांत करीत असत. नकटें व्हावें पण धाकटें होऊं नये म्हणतात; पण ती तर घरांत नकटीहि होती व धाकटीहि होती. पण त्यामुळेंच घरांत स्वतःचें व्यक्तिमत्व राखण्यासाठी तिला भांडावें लागत असे व तेंच तिला वर्गांत पुढारीपण मिळवून देण्यास कारण झालें. घरांत गोष्टी निघाल्या म्हणजे मामा म्हणतच तिचे, "मला माझ्या मुलींत दोघींबद्दल काळजी वाटते. यमुताईच्या बाबतींत वाटतं, अशक्त आहे, भोळसर आहे, तिचं पुढं कसं होईल ? आणि सुधाताईच्या बाबतींत वाटतं—सुधाकडे हसत पाहात ते पुढं म्हणत—हिच्या नवऱ्याचं पुढं कसं होईल ? " भांडखोरपणामुळे तिने पुढारीपणा मिळविला खरा; पण तो टिकविण्यास तिचा कष्टाळू स्वभाव व प्रेमळपणा उपयोगी पडला. एकदा आपल्या पक्षाची मुलगी म्हटली कीं तिला ती हरएक प्रकारें मदत करी व 'सुधा अॅण्ड कंपनीविरुद्ध सर्व जग'—या जगांत

इतर मुली, शिक्षक व मोठ्या बाईंचाहि समावेश होई-अशा अभिनिवेशाने त्यांचें रक्षण करी. मुलींना मदत करण्याचे तिचे प्रकारहि मोठे अभिनव असत. वर्गांत दारासमोरील दिसेल अशी जागा शोधून ती बसे व समोरून मुख्याध्यापिका वर्ग तपासणीसाठी येतांना दिसल्या की आपल्या गटाच्या मुलींना सूचना देई. कुणाला पेन्सिल कागद कमी पडूं लागला की सुधाजवळ जास्त हटकून सापडावयाचा. मास्तरनी एखाद्या मुलीला सुट्टीनंतर थांबून धडा करावयाची शिक्षा केली की हीपण तिजबरोबर थांबे. ऑफिससमोरून पावसांतून भिजत गेलेलें पाहिलें तर थोरल्या बाई रागावतील म्हणून आपल्या मैत्रिणीला धावत जाऊन छत्री देऊन येईल व आपण पागोळ्यांखाली भिजत उभी राहील.

वर्गांत एकदा कविता चालू होत्या. 'उज्जयिनीचें वर्णन' चाललें होतें. पूर्वीच्या उज्जयिनीच्या वैभवाचें वर्णन करून मग कवीने शेवटी म्हटलें होतें की, जरी तेंच उज्जयिनी नांव धारण करणारी नगरी आज उभी असली तरी केवळ नांवामुळे त्या उज्जयिनीची सर हिला येईल काय ? इ.

" नामैक्यें समता चुन्यास अमृता येईल कैशी तरी "—त्याप्रमाणे चुना व अमृत या दोघांना 'सुधा' म्हटलें तरी चुन्याला कधी अमृताची सर येईल काय ? मास्तर विनोदानें पुढे म्हणाले, " उदाहरणार्थ, आमच्या सुधाबाई. यांचें नांव सुधा किती जरी गोड असलें तरी अमृताची गोडी यांच्या भांडखोर स्वभावाला कधी येईल काय ? "

तिसरीच्या मुलींना हें हळूहळू कळलें. तेव्हापासून समोरून चौथीच्या गटाच्या मुली येऊं लागल्या की त्या म्हणूं लागत—'नामैक्यें समता चुन्यास अमृता येईल कैशी तरी.'

दुसऱ्या दिवशी चौथीचा गट सुधाच्या घरी तासभर जमला होता. व शाळेंत मथु ॲण्ड को. दिसल्याबरोबर त्यांनी सर्वांनी ओळीने उभें राहून पुढील कवन म्हणून दाखविलें—

" मंथरा, फिरे भरभरा, भांडणी त्वरा, उडे फुट्टाणा, वावरे तिसरिचा राणा "

इतर वर्गांच्या मुलींनीहि हें कवन ऐकलें व सर्वच जण येतां जातां मथूला व तिसरीच्या पुढारी गटाला ही कविता म्हणून चिडवूं लागल्या.

सकाळची शाळा होती व पंडित हृदयनाथ कुंझरू शाळा पाहावयास येऊन गेले. संध्याकाळीं सार्वजनिक सभेमध्ये त्यांचे हस्तें गांवांतील शाळांचा बक्षीस-समारंस होता. तिकडे सर्वांनी जावें अशी सूचना फलकावर लागली.

पांच वाजले व विद्यार्थिनी सभेस जाण्यासाठीं शाळेंत जमल्या "अग आज ते सकाळी 'शिंगरु' आले होते ना शाळा पहायला त्यांचें व्याख्यान आहे हो आज," मंथरा सांगूं लागली.

"शिंगरु" सुधा व तिच्या मैत्रिणी हसत म्हणाल्या. "तुम्ही तिसरीचीं 'शिंगरं' आहांत तेवढीं पुरे. म्हणे आजचे पाहुणे 'शिंगरुं'. नांवं तरी नीट उच्चारतां येतात का तिसरीच्या मुलींना!"

"मग सांगा पाहूं त्याचे नांव" तिसरीच्या एका मुलीने विचारलें.

"त्यांचं नांव 'खुश्रु' सुद्धा ॲण्ड को."

"अहाहा! ते काय कन्याशाळेच्या चौथीचे बादशाहा नव्हेत. म्हणे आमच्या लक्षांत नांवें राहतात." तिसरीच्या गटाने बोलून घेतलें.

पण नांव काय याचा निर्णय होईना.

"चला आपण थोरल्या बाईंनाच विचारूं खरं नांव काय तें." मंथरेनें सुचविलें.

"पण आमचं नांव बरोबर असलं तर काय द्याल? तुझ्या घरच्या कवठीची कवठं. आमच्या गटाच्या प्रत्येक मुलीला एकेक."

"कबूल, पण आमचं बरोबर असलं तर तुम्ही काय द्याल? तूं काल गोळ्या आणल्यास त्यांची निळी-काळी शाई. इन्स्पेक्शनच्या वेळीं लिहिण्यासाठीच."

"कबूल कबूल."

मोठ्या बाईंनी ऑफिसांतून हें भाषण ऐकलें होतें. त्या दारांत येऊन म्हणाल्या, "काय चालली आहे पैज?"

"कांही नाही बाई" आवाज मंदावून सुधा म्हणाली, "आजच्या पाहुण्यांचें नांव 'शिंगरु' की 'खुशरु'?"

"कुंझरू—शिंगरूहि नव्हे व खुश्रूहि नव्हे. मी पैज जिंकली. घेऊन या आता कवठे व शाई," बाई हसून म्हणाल्या.



"जमनी भराटे—"

"हजर!" तिनें उत्तर दिलें. तिला राहून राहून कौतुक वाटे आपल्या नांवाचें. आपल्याला आडनांव आहे आणि तें या शाळेंतच आल्यावर कसें कळलें अगदी. आणि यामुळेच ती शाळेंत जास्त नियमितपणें येई.

एके दिवशी संध्याकाळी तिने घरीं आपल्या बापाला—कृष्णाजीला—सख्याला सांगतांना ऐकलें, "अरे, उद्या आपली चावडी झाडून ठेवा. उद्या सकाळी त्या बायांच्या शाळेंतला तो दाढीवाला बुवा, त्या बाया व तो नाना पटवर्धन यायचा आहे!" तिला वाटलें, हनुमानजयंतीसारखे कांही असेल. थोड्याच दिवसांपूर्वी त्यांच्या चावडीच्या शेजारच्या मारुतीच्या देवळांत एक दाढीवाला बुवा येऊन त्याने कथा केली. गुलाल, बुक्का व फुलें मारुतीवर उधळलीं व खिरापत वांटली होती. म्हणून दुसऱ्या दिवशी कथा पाहावयाला म्हणून तीहि तेथे गेली. पण आजची कथा कांही वेगळीच होती. चावडीवर पांचसात पाहुण्या बाया व बुवा बसले होते. गांवांतील पाटील व इतरहि शेतकरी जमले होते. शिवाय त्यांच्या समोरच गांवांतील पांचपंचवीस मुलगे व पांच-सात मुली बसल्या होत्या. कथेकरीबुवांनी गाणें म्हणावयाच्या ऐवजी दोन बायांनीच म्हटलें व लागलीच कथेकरीबुवा झांज चिपळ्या कांहीच न घेतां बसूनच बोलूं लागले. तिला दूर झाडाखाली उभी राहिलेली पाहून एक बाई आली व म्हणाली, "चल त्या मुलींच्यामध्ये बसायला लिवायला" व तिने तिला नेऊन मुलींच्यांत बसविलें. थोड्या वेळाने त्या दाढीवाल्या म्हातारबुवाने मुलांनाच एक गाणें म्हणायला शिकविलें आणि सांगितलें, "उद्यापासून शिकायला या हं" आणि झालें, आरतीबिरती न करतांच एकदम खिरापत वांटली. 'असली नव्हती बाई कथा कधी पाहिली' असें म्हणत बत्तासे खात खात ती परत आली होती.

पण दुसऱ्या दिवशी ती गाणं म्हणणारी बाई तिच्या घरींच आली तिला लिवायला बोलावणं करायला. चावडीवर गेली तों गणप्या, नाऱ्या, हणम्या, गांवांतील बहुतेक सारीं मुलें ओळीने बसलीं होतीं; शिवाय पाटलांची चिमी,

गंगी व इतर पांच-सात मुलीहि होत्या. एक तास ही गंमत झाल्यावर बाईने एक कागद काढला व विचारलें, " मुली, तुझें नांव काय ? "

" माझं नांव व्हय, " ती विचार करीत म्हणाली. " माझं नांव जमनी ! "

" आणि आडनांव काय तुझं ! " ती बाई म्हणाली.

" मला नाही आडनांव बिडनांव. मला नांवच आहे."

" असं नाही. तुझ्या घराचं नांव काय ? "

" घराचं नांव ? " म्हणून ती जास्तच गोंधळून पाहूं लागली.

" तूं कृष्णाजी भराट्याची मुलगी ना ? "

" व्हय की ! "

" मग भराटे तुझं आडनांव, कृष्णाजी तुझ्या बापाचं नांव, तुझं नांव जमनी भराटे."

मग त्या बाईने मुली-मुलांचीं नांवें वाचलीं. प्रत्येकजण 'हजर' म्हणे. बाई म्हणाली, " जमने, नांव वाचलं म्हणजे 'हजर' म्हण हं."

" हां हां " जमनीने मान हलविली.

" जमनी भराटे–"

" हजर ! "

तिला राहून राहून गंमत वाटत होती की, आपल्याला आडनांव आहे आणि इतके दिवस कसें आपल्याला कुणीं सांगितलें नाही ? बापाला कृष्णा भराट्या म्हणून म्हणत. पण भराट्या हें आडनांव आहे व बायकांना आडनांवं लावतात हेंहि तिला माहीत नव्हतें. तिच्या आईला कधी रकमी भराटे म्हटलेलें तिने ऐकलें नव्हतें. बहिणीला कोणी बायडी भराटे म्हणत नसे. या नवलाईनेच ती शाळेंत जाऊं लागली व मास्तरीण एखाद्या वेळी हजेरी विसरणार असें वाटलें की म्हणे " तें बोलना 'जमनी भराटे'–'हजर' ! "

पुढे शिकवावयाला येणाऱ्या बाया व मास्तरहि तिचें कौतुक करीत; त्या-मुळे तिला ज्ास्तच जावेंसें वाटे. कारण त्यांच्या शाळेंतील ती एकुलती एक मुलगी होती. मुलें आणि मुली दोघांसाठी म्हणून शाळा काढली; पण मुलेंच येण्याची पंचाईत तेथे मुली कोठल्या ! चार पांच मुलींचीं नांवें हजेरी-पटावर होतीं खरीं. पण त्यांपैकी नेमाने येणारी व 'ही पाहा आमची विद्यार्थिनी,

घ्या हिची परीक्षा' असें जिच्याबद्दल म्हणतां येईल अशी ही येवढीच होती; व म्हणून तर सर्वांना तिच्याबद्दल कौतुक वाटे.

एकंदरींत त्यांचा गांव आळशीच. घरांतील माणसेंच उशीरा उठत; मग मुलें कुठलीं लवकर उठायला! शाळेला सुरुवात झाल्यावर प्रथम कांही दिवस मास्तर व बाईनाच जावें लागलें, शाळेंत मुलें कां आलीं नाहीत या चौकशीला. हणम्या तर स्वस्थ निजलेला असे; किंवा उठला असला, तरी सकाळच्या उन्हांत कोठे तरी आळसावून बसलेला सापडे. जमनी मात्र लवकर उठून 'साळला' हजर होई. कसे तरी केस सावरी. कारण वेणी रोज घालण्याची पद्धतीच नव्हती तिच्या घरीं. एक चिटाचा विटका परकर तिचा होता व त्यावर एक गुलाबी पोलका ती घाली. मागच्या जत्रेंत तिच्या बापाने तिला एक भडक गुलाबी रंगाचा पोलका विकत आणला होता. सहा महिने होऊन गेले होते त्याला, पण अजून ती तो कोराच वापरी. इतका रंगीत पोलका धुतला, तर रंग जाईल म्हणून तिची आई तो धुऊन देत नसे.

खरें म्हणजे इतर मुलींप्रमाणे तिलाहि शाळेंत येण्याला अडचण व्हावी. दुसऱ्या मुलींना धाकटीं भावंडें संभाळावयाला आया सांगत. शेणी थापायला सांगत. पण हीच सर्वांत धाकटी, त्यामुळे तिच्याहून लहान भावंडं संभाळ-ण्याचा प्रश्नच नव्हता. वडील बहीण होती ती गवऱ्या लावी, गोठा झाडी; यामुळे ही मधल्यामध्ये मोकळी राही. कृष्णाजी कौतुकाने म्हणे, "जमने, जा की साळला!"

शाळेंतल्या सगळ्याच गोष्टींची तिला नवलाई वाटे— घंटा झाल्याबरोबर सगळ्यांनी हात जोडून 'नमो देवराया' म्हणणें; 'एक' म्हटलें की सर्वांनी उभें राहावयाचें व 'दोन' म्हटलें की बसावयाचें, 'तीन' म्हटलें की तोंडें फिरवावयाचीं; ही काय गंमत! आदरार्थी बहुवचन तिला माहीतच नव्हतें. पेन्सिल हरवली की ती बसल्या जागेवरून हाक मारून म्हणे, "ए मास्तरीण मला पेन्शन दे ना ग!"

बाई हसून म्हणत, "अग, किती वर्षं नोकरी केली?"

तिला किती शिकविलं की, मास्तरना व बाईंना अहो जाहो म्हणावें तरी मधून मधून ती सवयीने एकदम 'ए मास्तर' म्हणे.

तिची स्मरणशक्ति बरी होती. त्यामुळें मुलांच्यापेक्षाहि केव्हां केव्हां ती उत्तरें बरोबर देई. विसांपर्यंत पाढे झाले होते. पाढ्यांतील प्रश्नांचीं उत्तरें ती बिनचूक देई. शिवाजीची गोष्ट, रामाची गोष्ट वगैरे सांगितलेल्या गोष्टीहि तिच्या लक्षांत राहात. मुलांना उत्तर आलें नाही म्हणजे मास्तर तिजकडे वळून म्हणत, " जमने तूं सांग, किती पंचे वीस ? "

" चारा पंचे वीस ! " जमनी उत्तर देई.

मास्तर म्हणत, " पाहा रे मुलांनो, ही मुलगी कसें बरोबर उत्तर देते तें." आणि तिला खरंच वाटूं लागलं की, आपलं उत्तर बरोबर असायचंच.

मास्तर गणप्याला विचारीत होते, " किती दाही दीडशें ? " गणप्याचें लक्ष नव्हतें. तो गोंधळून इकडे तिकडे पाहूं लागला.

" सांग कांही तरी " मास्तर जरा रागावून म्हणाले.

" अदमास पंचे दाहोदरसें."

जमनीच्या तेवढेंच लक्षांत राहिलें !

आठ दिवसांनी त्यांच्या शाळेची परीक्षा घ्यायला मोठे मास्तर येणार असें त्यांच्या मास्तरांनी सांगितलें. व गप्प बसूं नका, येत असेल तें उत्तर द्या असेंहि सांगितलें. परीक्षा सुरू झाली. पाढ्यांची चाचणी होत होती. वीस-पर्यंतच्या पाढ्यांची चाचणी झाल्यावर मोठे मास्तरांनी तीसपर्यंत पाढे झालेल्या मुलांची चाचणी घेण्यास सुरुवात केली. दोन-चार प्रश्न झाल्यावर " किती पंचे दाहोदरशें ? " प्रश्न आला. कोणाला येईना. " कोण बरं उत्तर सांगेल ? " मास्तर सर्वांकडे पाहत म्हणाले. जमनीने हात वर केला व उठून सांगितलें, " अदमास पंचे दाहोदरसें ! "

पाढे झाल्यावर इतिहास निघाला. मागच्या आठवड्यांतच शिवाजी व संभाजी यांच्या गोष्टी झाल्या होत्या. मास्तरांनी प्रश्नोत्तरपद्धतीचा अवलंब केला. शिवाजीच्या मुलाचें नांव काय ? " मुलाना आठवेना. मास्तर सर्वांना विचारीत पुढे चालले. " शिवाजीच्या मुलाचें नांव काय ?–नांव काय ? तूं खालचा मुलगा, नांव काय ? " पण कोणासच आठवेना. जमनी मध्येच उठून म्हणाली, " मास्तर मी सांगूं ? "

'सांग' परीक्षक कौतुकाने म्हणाले. मुलांना प्रश्न येत नाही व ही मुलगी बरोबर उत्तर देते, असें त्यांना वाटलें.

जमनीने उठून चटदिशीं सांगितलें, "जमनी मराटे!!"



## चिमणा : : : ११

त्याचें बोलणें ऐकूं लागलें म्हणजे आपण 'अरेबियन नाईट्स्' वाचतों आहों असें वाटे व म्हणून प्रत्येक जण त्याला वेगवेगळे प्रश्न विचारून बोलावयास लावी. तोहि गोष्टीवेल्हाळ प्रत्येकाच्या प्रश्नाला उत्तर देऊन पुन्हा आपल्या कल्पनेप्रमाणे कार्यकारणसंबंधहि सांगे व त्यांत स्वतःचें जेवण विसरे. शेवटी आई कंटाळून म्हणे, "नका रे त्याला बोलायला लावूं, त्याचें जेवण राहतें!" पण तो कंटाळत नसे. "मी एक गोष्ट सांगतों हं," तो म्हणे व गोष्ट सुरू होई. "एक दिवशी मी चार भिंतीकडे फिरावयाला गेलों. मग वाटेंत भूक लागली म्हणून वर पाहिलें. तों शेजारच्या नारळाच्या झाडावर भीमलाल हलवावायाचें दुकान. मग वर गेलों तों एका बाकावर बसून हत्ती चहा पीत होता." मंडळी हसूं लागत; पण हत्ती नारळाच्या झाडावर चढला कसा हें त्याला कोणी विचारीत नसे. कारण "कसा म्हणजे, शेजारच्या पोपइच्या झाडावर एक पाय देऊन" हें त्याचें उत्तर सर्वांना माहीत झालें होतें. तरी पण वसंतदादा विचारी, "काय रे मक्या, तो हत्ती बाकावर बसला होता आणि तुला जागा उरली तिथे?"

"छे हो!" तो उत्तर देई, "हत्तीने मला सोंडेने उचलून पलीकडल्या बाकावर बसविलें. मग मी पेढा खाल्ला व उडी मारून मोटारींत बसलों व पुण्याला गेलों. पों पों मोटारचें शिंग वाजलें. मग आजोबा बाहेर आले व म्हणाले, 'अरे लबाडा, तूं केव्हा आलास?' मावशी आली व म्हणाली, 'अरे कम्या, तूं कसा आलास?' आणि आजी आली ती पोतेंभर लाडू घेऊन, आजोबा म्हणाले, 'कम्या, तुला मोदक आवडतात ना! हें बघ मीं मोदकाचें

झाड लावलें आहे व शेजारी ही तुपाची विहीर. भूक लागली की बागेंत यावें. एक मोदक तोडावा, विहिरींत बुडवावा की खावा; आईला मागायला नको, की आजीला मागायला नको की कांही नको.' " आणि अशी ही गोष्ट, सांगणारा किंवा ऐकणारा कोणी तरी दमेपर्यंत चाले.

घरांत सर्व भावंडांत धाकटा या अर्थी तो चिमणा खरा; पण, चिमणीचा भाऊ म्हणून त्याला प्रथम घरांत सर्व लोक 'चिमणा' म्हणूं लागले. खरें नांव मुकुंद; पण कोणी 'कम्या' म्हणे, कोणी 'चिम्या' म्हणे, तर कोणी 'मक्या' म्हणे. मुकुंद नांवाचे जितके वेगळे वेगळे प्रकार करणें शक्य आहे तितके त्याला हांक मारतांना होत. संध्याकाळी जेवतांना त्याच्या गोष्टींना बहर येई; कारण कोणाला लवकर जेवून उठावयाची गडबड नसे व सर्व मंडळी वेगवेगळे प्रश्न विचारून त्याला अडवूं पहात. घरांत अनेक विषयांवर बोलणीं चाललेलीं तो ऐके व त्यांतील एखादें वाक्य मोठ्या ऐटीने उपयोगांत आणी. संध्याकाळीं जेवतांना तो सर्व दिवसाच्या हकीगती सांगे. "आज किनी वासुकाका," तो वडिलांना सांगे, "आज दुपारी एक बाई आईकडे आली होती व लुगडें मागत होती. मी आईला म्हटलें, 'दे की तुझें काल नवीन आणलेलें लुगडें.' कारण "दीनावर दया करा."

"दीन म्हणजे काय रे?" त्याच्या चिमूताईने प्रश्न केला.

"येवढें काय मला माहीत नाही! दीन म्हणजे गरीब. ज्याच्याजवळ कांही नाही तो."

"पण ती गरीब कशावरून?" वसंतदादाने त्याला पुनः विचारलें.

"वा! तिचें लुगडें फाटकें होतें. तिच्या हातांत बिलवर नव्हते, गळ्यांत साखळी नव्हती. म्हणून ती गरीब. आई तिच्यापेक्षा श्रीमंत आहे. कारण तिच्या हातांत बिलवर आहेत, गळ्यांत साखळी आहे."

"मग आई जास्त श्रीमंत का वासुकाका जास्त श्रीमंत?" राजारामाने प्रश्न केला.

"वासुकाका जास्त श्रीमंत!" मुकुंद म्हणाला.

"पण त्यांच्या हातांत बिलवर नाहीत, की गळ्यांत साखळी नाहीं" राजारामाने अडविलें. "वा! आम्हांला कांही तरी सांगतोस होय?"

या प्रश्नाचें त्याला उत्तर देतां येईना. हातांत बिलवर नसले तरी वासुकाकाच आईपेक्षा श्रीमंत असें त्याला वाटे मात्र; कसें तें त्यालाहि सांगतां येईना. पण तो न चिडतां म्हणे, " हें पहा, मला असे अडवूं नका. माझ्या कल्पनेला जसें सुचेंत तसें मी सांगतों." यावर सर्व हसत व म्हणत " वा हो कल्पनाचतुर! आम्हांला पटवून द्या की! तुम्हांला सुचेल तें तें आम्ही ऐकावयाचें काय?"

त्याचा राजामामा लवकरच बी. ए. झाला व पुढे काय करावयाचें याची चर्चा जेवतांना चालली होती. सर्व भावाबहिणींना वासुकाकांनी पाळीपाळीने प्रश्न केला, " वसंत, तूं कोण होणार? लीला, तूं कोण होणार?" सर्वांच्या शेवटी वासुकाकांनीं मुकुंदाकडे वळून विचारलें, " मक्या, तूं पुढें कोण होणार?

" मी होय?" मुकुंद गंभीरपणें म्हणाला, " गव्हर्नर तरी होईन नाही तर ड्रायव्हर तरी होईन.

त्यांचे गांवीं नुकताच गव्हर्नर येऊन गेला होता व त्याचे स्वागताचा कडेकोट बंदोबस्त त्याने पाहिला होता. त्यावरून गव्हर्नर म्हणजे कुणी तरी मोठा येवढें त्याला वाटलें; पण त्याला खरा आदर ड्रायव्हरबद्दल. मोटारमध्ये चाक हातांत धरून बसलेली व डोक्यावर थबकडी टोपी घातलेली ड्रायव्हरची मूर्ति म्हणजे त्याचे मतें जगांतील अत्युच्च शक्ति होती. पण ड्रायव्हरशीं तुलना करतांना त्याला एकदम गव्हर्नरच आठवला याचें कारण त्यांच्या कर्तबगारीपेक्षां त्यांच्या नांवांतील साम्यच जास्त होतें.

उन्हाळ्याची सुट्टी सुरू व्हावयाची होती व त्याचे चुलते, चुलत्या व त्यांचीं मुलें वगैरे सर्व जमावयाचीं होतीं. पाहुणे येण्याच्या दिवशी घरांतील लहान मुलांना बोलावून वासुकाकांनी सांगितलें की, " हें पाहा, आपल्या घरीं आता आणखी लहान मुलें येणार आहेत. तेव्हा जो खेळ आहे तो घेऊन सर्वजण खेळा. हें तुझें, हें माझें, हें तुला द्यावयाचें नाही असें करावयाचें नाही. सगळ्या वस्तु सगळ्यांच्या आहेत असें समजून चालावयाचें." चिमण्याचा वासुकाकांवर असीम विश्वास व ते सांगत ती गोष्ट तो वेदवाक्याप्रमाणे मानी.

मंडळी जमली व सुट्टीच्या कार्यक्रमास सुरुवात झाली. मोठीं माणसें आपली करमणूक करीत तसाच लहान मुलांच्या कार्यक्रमालाहि भर आला

होता. एके दिवशी दुपारी माजघरांत धुणें वाळत घालण्याच्या दांड्यांवर लीलाताईच्या साड्यांचे पडदे सोडून एक नाटक मुलांनी केलें. हें नाटक त्यांची चुलत बहीण विमल हिने मुद्दाम लिहून दिलें होतें. भरतभेटीचें कथानक त्यांत होतें. नाटक फार यशस्वी झालें व लोकाग्रहास्तव त्याचा दुसरा प्रयोग करण्याचें ठरलें.

नाटकाची पूर्वतयारी होऊं लागली. पात्रें रंगूं लागलीं. वसंतदादाने हिराच्या चार काड्या एकत्र बांधल्या व त्याला विमलच्या वेणीला बांधावयाचा रेशमी गोंडा बांधून मारुतीचें शेपूट तयार केलें. मारुतीचें काम चिमणा करीत असे. काकांचा यशवंत म्हणजे राम व नलू म्हणजे सीता; यांनीं सिंहासनावर बसावयाचें व मारुतीने त्यांच्या पायांशीं हात जोडून बसावयाचें असा देखावा काल दाखविला होता. "हं, चल चिमण्या, ही बघ तुझी शेपूट तयार झाली" वसंतदादा म्हणाला. आज पुनः मारुति होण्याला व गुडघे मोडून पायाशीं बसण्याला तो कंटाळला. "हें पाहा, वसंतदादा," चिमण्याने समजुतीने विचारलें "मी आज वाटलें तर मारुति होतों. पण सीता मारुतीची बायको व राम पायाशीं बसला आहे असें नाटक करा ना आज."

चिमण्याने समजूत घेतली खरी, पण राम आणि भरत यांच्यांतच भांडण सुरू झालें. माधव म्हणे, "मी नाही आज भरत होऊन, भगवी जुनी कफनी घालणार. मी आज राम होऊन किरीटकुंडलें घालून सिंहासनावर (म्हणजे मोडक्या खुर्चीवर) बसणार." "वा रे वा!" यशवंत म्हणे, "मी नाही पुनः भरताचें भाषण पाठ करणार." शेवटीं मारामारी होऊन किरीटकुंडलें तुटलीं व या नाटकांतील नाटकांत रोदनाङ्क सुरू झाला.

"थांब; मी आता तुझ्या आईला जाऊन सांगतों की, माधवने माझा मुकुट तोडला म्हणून" यशवंत रडत रडत बोलूं लागला.

"मग सांगेनास; मीहि माझ्या आईला सांगेन की, तोच कोण रोज राम होणार? मीच तुझ्या आईला आधी जाऊन सांगतों."

मुकुंदाने आतापर्यंत सर्व मुकाट्याने पाहिलें होतें. आता तो एकदम पुढे आला व म्हणाला, "अरे, तुझी आई माझी आई काय करतां!" वासु-

काकांनी काय सांगितलें आहे आपल्याला की, तुझें माझें करायचें नाहीं. सगळ्या आया सगळ्यांच्या आहेत!"

वासुकाकांच्या मित्रमंडळींत त्याची फार चहा असे. तो सर्वांच्याबरोबर गप्पा मारी, चर्चा करी व तो एक जबाबदार मनुष्य आहे अशा तऱ्हेने सर्वांनी त्याच्याशीं वागावें असें त्याला वाटे. एकदा तो नानासाहेबांवर बराच रागावला होता. कारण त्यांनी त्याला आपल्या घरीं जेवावयास बोलावलें व भरपंक्तींत म्हटलें, "ए एडबंबू! पोटभर जेव बरं का! नाही तर घरीं गेलास की भूक लागेल." मग वासुकाकांनी सांगितल्यावरून नानासाहेब म्हणाले, "चिमण्या, मी विसरलों, बाबा, तूं मोठा आहेस हें; तुझी क्षमा मागतों; मग झालें ना!" आणि मग त्याचा राग गेला. लहान मुलांशीं वागावें कसें हें आण्णासाहेबांना जरा जास्त समजतें असें त्याला वाटे. कारण त्यांनी एकदा त्याच्या नांवाने चिठी लिहून, आणखी ती पाकिटांत बंद करून पाठविली. लागलीच त्याला इतकी जबाबदारी वाटली की, चिठ्ठींत लिहिलेलें पुस्तक वासुकाकांकडून काढून घेऊन, तो स्वतः आण्णासाहेबांना तें आधी देऊन आला!

कोणतीहि कल्पना मनांत आली की प्रथम तो धावत वासुकाकांकडे जाऊन त्यांना ती सांगून येई. एक दिवशी वासुकाका लिहीत होते. कम्या एकदम खेळतां खेळतां धावत आला व म्हणाला, "वासुकाका, मला एक कल्पना सुचली आहे." "ती काय?" वासुकाकांनी त्याच्याकडे दृष्टि वळविली.

"आपण पुढे लग्न करणार नाही. रानांत एक तंबू ठोकणार. चारपाच शिकारी कुत्रे बाळगणार की बस! बायकोबियको कुच नाही."

"पण बायको कां नको?" वासुकाका म्हणाले.

"समजा, आपण अरण्यांत फिरावयाला गेलों;" मुकुंद त्यांना समजावून सांगूं लागला, "व समोरून एक वाघ आला आपल्या अंगावर धावून. बरोबर बायको असली तर ती काय करणार? हो! काय करणार बायको? त्यापेक्षा चार कुत्रे असले, तर ते वाघाच्या अंगावर धावून नाही का जाणार?"

संध्याकाळी मित्र-मंडळी जमली असतां वासुकाकांनी आपल्या मुलाचा निश्चय सांगितला. नानासाहेबांनी त्याला हाक मारून त्याच्या निश्चयाबद्दल

शाबासकी दिली व म्हटलें, " शाबास, मक्या तुला हें आतांच कळलें. आम्हांला ही गोष्ट फार उशीरा कळली रे ! "

आण्णासाहेब म्हणाले, " छे रे चिमण्या, तुला कळत नाही. असली भीष्मप्रतिज्ञा करूं नये. एक बायको बरोबर असल्यावर वाघच काय पण सिंहसुद्धा आपल्या अंगावर उडी मारूं शकत नाही, की रस्त्यांतली मारकी म्हैस मारूं शकत नाही." त्यांनी पुष्कळ समजूत घातली. पण त्याचा कृतनिश्चय ढळेना.

" तें कांही नाही," भीष्माच्या दृढतेने तो म्हणे, " आपलं एकदा ठरलं तें ठरलं ! "

तेव्हापासून आण्णासाहेब मात्र घरीं आल्याबरोबर त्याला प्रथम विचारत, " काय कल्पनाचतुर ! आज काय बाबा, तुला नवी कल्पना सुचली ? "



## रा त रा णी : : : १२

माझें प्रथम तिच्याकडे लक्ष वेधलें तें इंग्लिशच्या तासाला. दिवाळीची सुटी सुरू व्हावयाची होती व तो शेवटचा तास होता तिसरीवरचा. मंगलकार्य संपल्यावर मांडवदळ लागावें त्याप्रमाणे सहामाही संपल्यावर शाळेच्या वातावरणांतहि मांडवदळाचें शैथिल्य व औदासीन्य उत्पन्न झालें होतें. वसतिगृहाला जोडून असलेल्या शाळेंत तर याची जाणीव जास्त तीव्रपणें होते. ठरीव कार्यक्रमापेक्षा प्रत्येकीचें लक्ष, घर व सुटींतील इतर कार्यक्रम यांच्याकडेच लागलें होतें. पण उरलेली एक छोटीशी कविता पुरी करावयाचें मीं आज ठरविलें होतें. कवितेंतील विचाराच्या सखोलतेपेक्षा भाषेच्या सोप्या घडणीमुळेच ती या क्रमिक पुस्तकांत समाविष्ट झाली होती—

" 'T is the last rose of summer
Left blooming alone
While all her lovely companions
Are faded and gone."

कविता वाचून मीं वर पाहिलें तों रातराणी माझ्या दृष्टीस पडली. शेवटच्या बाकावर एकटीच बसून ती ऐकत होती. मला वाटलें हें वर्णन हिला लागू पडतें नाही ! कारण काल रात्री प्रार्थनेचे वेळी कोण कोठे जाणार याची नोंद केली तेव्हा ज्या चारच मुली घरीं जाणें शक्य नसल्याने वसतिगृहांत राहावयाच्या होत्या त्यांत तिचें नांव आलें. त्या चौघींतहि ही सर्वांत लहान होती. सर्व मुली घरीं जाण्याच्या आनंदांत; पण ही मात्र त्या आनंदाला पारखी होणार होती. तिजकडे एक दृष्टिक्षेप करून मीं कविता पुढे वाचली व स्पष्टीकरण वगैरे केलें.

" When friendships decay, when fond ones are flown,
Who would inhabit this bleak world alone ? "

या शेवटच्या समारोपात्मक ओळींचाहि अर्थ सांगून झाला. तिसरीच्या छोट्या छोट्या मुली; त्याच्यापुढे या ओळींतील खोल अर्थाची चर्चा काय करणार, त्यांना कळणार काय व कळली तरी पटणार काय ?

" 'T is the last rose of summer,
Left blooming alone "

ह्या ओळी वाचल्यापासूनच गोदूने खिडकीबाहेर व्हरांड्यांत असलेल्या कुंडींतील एकाच गुलाबाच्या फुलाकडे पाहावयास सुरवात केली होती व तास संपून आपण तें फूल तोडतों केव्हा याचाच विचार तिच्या चेहऱ्यावर दिसत होता. फारसें खोल विवरण करण्याच्या भानगडींत न पडतां मीं कविता संपविली; सर्व अर्थ एकदम ध्यानांत यावा व कोणास कितपत कळलें आहे हें स्वतःलाहि अजमावतां यावें या हेतूने मुलींच्याकडे पाहात ती कविता पुन्हा सबंध वाचली. रातराणीचा चेहरा गोरामोरा झालेला होता व डोळ्यांत उभें राहिलेलें पाणी तिने मुकाट्याने साडीच्या पदराला पुसलें. तास संपला व सुट्टी सुरू झाली. सुधा व तिच्या मैत्रिणी यांचें व्हरांड्यांतील कुंड्यांतील गुलाबाभोवती वाटोळें उभें राहून साभिनय व नर्तनयुक्त " 'T is the last rose of summer " चें रसग्रहण चालू झालें. रातराणी मात्र या गलक्यात न मिसळतां मुकाट्याने पुस्तकें उचलून वसतिगृहाकडे चालूं लागली.

दोन वर्षांपूर्वी ज्या दिवशी ती शाळेंत आली त्या दिवशी सर्व मंडळींना तिने आश्चर्याचा थोडासा धक्काच दिला.

" आज तर पौर्णिमा; पण वर्गात गेलों तों अमावास्येचा अंधार पडलेला." रा. कोटिभास्करांनी शिक्षकांचे खोलींत प्रवेश करतां करतां बोलण्यास सुरुवात केली.

" पहिलीच्या वर्गांत ना ? अगदी बरोबर !" ढोबळे मास्तर म्हणाले, " कोण हो ही नवी मुलगी आली आहे आज शाळेंत ? प्रभाला तिला शेजारी शेजारी पाहून मला अमावास्या व पौर्णिमा एकत्र बसल्यासें वाटलें."

" ती नवी मुलगी होय ? राणी गोरे." सरलाबाई म्हणाल्या, " आपल्या कृष्णाताई तर तिला आज शाळेंत घेऊन आल्या."

" हिचें नांव। राणी गोरे ? छान !" " ॲबिसीनियाची राणी दिसते." ढोबळे मास्तर एकदम मोठ्यानें ओरडले.

" काळोखाची राणी होती
हृदयीं भरल्या होत्या खंती
अंधारांतचि लपलें सारें
चित्त न लक्षी वरचे तारे "

" अहो केशवसुत " ढोबळे मास्तर म्हणाले, हें सर्व काव्य व कोट्या कोटिभास्करांनी करायच्या असतात.

" नांवाचा व व्यक्तिगुणाचा तसा कधींच संबंध नसतो म्हणा ! पण ढळढळीत इतकी काळी मुलगी दिसत असून 'राणी गोरे' नांव कां ठेवलें ?" कोटिभास्करांनी प्रश्न केला.

" गोरे आडनांवाला ती काय करणार व तिचे आईबाप तरी काय करणार ?" पित्रे मास्तर उद्गारले; " पण असें वाटतें खरें की, निदान व्यक्तीचें नांव तरी शक्य तितकें अनुरूप असावें."

" आपल्याला हें एकदम नापसंत आहे." शांताबाई चहाचा पेला खाली ठेवून ओरडून म्हणाल्या. " अहो, पुढे जन्मभर लोक अनुरूप नांवें ठेवीतच असतात. हें एकच नांव जरा कौतुकाने ठेवलें जायचें, त्यांतहि रूपगुणाची चर्चा कशाला ? तशीं नांवें ठेवलीं गेलीं तर आपलें एक तरी नांव टिकेल का ?"

" तुमचें शांताबाई नांव प्रथम बदललें जाईल नाही ?" कोटिभास्करांनी प्रश्नार्थक उद्गार काढला.

चहा संपला व मंडळी पांगली. मीहि पुस्तकें घेऊन बाहेर आलें. मधल्या चौकांत सुधा आणि कं.च्या 'हुतूतू'च्या डावाला जोर आला होता व राणी गोरे एका कडेला उभी राहून तो पाहात होती. अपरिचित व शहरी वातावरणांत एकदम येऊन पडल्यामुळे तिची मुद्रा जास्तच बावरलेली दिसत होती. मीं निरखून पाहिले तिला नाक डोळे होते व तेहि नीटस होते; पण काळ्या वर्णापुढे ते डोळ्यांत भरत नसत. नाही तरी अमावास्येच्या अंधारालाच सर्व भितात. जास्त डोळे उघडून आंतील तारकांचा खजिना पाहतो कोण? तिला कल्पना नव्हती की, आज आपण लोकांची किती करमणूक केली.

तिचें नांव कोणीं रूपगुणावरून ठेवलें नव्हतें, तसेंच कौतुकानेहि ठेवलें नव्हतें. तें आपोआप पडलें, झालें. कारण हिच्या बारशाची कोणास आठवणच झाली नाही. प्लेगच्या दिवसांत झोपड्यांत लोक राहावयास गेले असतां रानांत हिचा जन्म झाला. आई आजारी होऊन पंधराव्या दिवशींच वारली. बापहि दोन महिन्यांत प्लेगाने वारला. दुःखीकष्टी आजी काय नांव ठेवणार? पांचसहा वर्षांत मावशीच्या स्वाधीन या अनाथ मुलीला करून तीहि देवाघरीं गेली. रानांत जन्मलेली म्हणून 'रानी' म्हणत असे आजी तिला. मावशीला व तिच्या घरच्या मंडळींना तो अर्थ न कळून त्यांच्या घरीं 'राणी' नांव झालें इतकेंच.

अंगावर दागिना तर नव्हताच, पण झुळझुळीत व तिला शोभून दिसेल असा कपडाहि तिच्या अंगावर नव्हता. मावशी बिचारी परस्वाधीन. कसा तरी अंगभर धड कपडा भाचीला पुरवितां आला, म्हणजे पुष्कळ झालें असें ती समजे. तिच्या चेहऱ्याला कोणती केशरचना शोभेल अगर कोणता कपडा तिला बरा दिसेल हें ठरवावयाला तिला वेळ व साधन तरी होतें कोठे? गळ्यांतील हिरवी पोत, हातांतील जाडजाड जांभळे व तांबडे ढोसले हे तिचा काळेपणा जास्तच उठून दाखवीत तर धनवडी विटकी साडी व मळका कुडता तिचा राकटपणा वाढवीत. कोणाचा पोषाक कसा असावा याबद्दल जे प्रत्येक ठिकाणीं परिस्थितिजन्य अलिखित नियम रूढ होतात, त्या नियमांना हिच्या पोशाखाने धक्का बसल्यासारखा वाटे. वर्गांतील मुलींनाहि ही आपल्यांपैकी कोणी नाही, कोठल्या तरी दुसऱ्या देशांतील मुलगी आपल्यांत आणून

सोडली आहे असें वाटे. कृष्णाताईंनी खटपट करून, तिला नादार म्हणून वसतिगृहांत प्रवेश मिळवून दिला, म्हणून ती शाळेंत तरी येऊं शकली.

दिवाळीच्या सुटींत कांही करमणूक असावी म्हणून शाळेंत प्रभात-मंडळाची सुरुवात केली होती. सूर्योदयाच्या वेळी सर्वांनी जमावयाचें व चरित्रपर ग्रंथ वाचावयाचा, चर्चा करावयाची, अशी या मंडळाची योजना होती. बुकर टी वॉशिंग्टन, धर्मानंद कौशांबी यांचीं चरित्रें वाचलीं व प्रभात-मंडळाची कल्पना सर्वांना आवडते असें वाटल्यानें शाळा सुरू झाल्यावरहि हा कार्यक्रम चालू राहिला. डॉ. आनंदीबाई जोशी व पंडिता रमाबाई यांचींहि चरित्रें पुढे वाचलीं. या वाचनाच्या वेळी माझा तिचा जास्त परिचय घडला. विशेषतः पंडिता रमाबाईचें बाळपण, तिने काढलेल्या हालअपेष्टा वाचल्या जात तेव्हा हिच्या चेहऱ्यावर जास्त परिणाम झालेला दिसे. सुटींत एकटें वाटलें म्हणजे केव्हा केव्हा ती माझ्या खोलींत येऊन बसे व लहानपणाच्या आठवणीहि सांगे.

दोन वर्षांच्या अवधींत ती शाळेच्या वातावरणांत सामावली होती. म्हणजे तिच्याबद्दल कोणाची कधी तक्रार नसे इतकेंच. प्रत्येक गोष्टींत पड खावयाची व कोणाच्या डोळ्यांत न खुपतां राहावयाचें अशी सवय तिला परिस्थितीनेच लावली होती. शालेय राहणीची थोडीशी सवय झाल्याने तिचा खेडवळपणा पूर्वीइतका डोळ्यांत भरत नसे. पण तिचा पूर्वीचा बावळेपणा गेला असला तरी त्याच्या जागीं बालसुलभ उत्साह व खेळकरपणा न येतां अकालपरिपक्वता आली. दृष्टि नसणाऱ्या माणसाचें श्रवणेंद्रिय जास्त तीक्ष्ण व्हावें त्याचप्रमाणे आईबापांच्या प्रेमळ छत्राचें कमी पडणारें संरक्षण निसर्ग अशा मुलांना जास्त समजूत देऊन भरून काढतो.

शाळा सुरू होण्यास दहा-एक मिनिटांचा अवधि होता; व सर्व शिक्षक ऑफिसमध्ये जमले होते. घाईघाईने रा. कोटिभास्करांनी प्रवेश केला व सांगावयास सुरुवात केली, "आता गोगटे वकील भेटले होते. माझें अभिनंदन करून ते म्हणाले, 'छान! तुमच्या कन्याशाळेंतील विद्यार्थिनीने आमच्या गांवच्या एका सहा महिन्यांच्या मुलाला आगीपासून वांचवलें. अहो, खुद्द कथेकरीबुवांनीच कथेंत ही गोष्ट सांगितली." "आम्ही हें आताच ऐकतों आहों. पण हें कोठे घडलें?" रा. ढोबळे यांनी प्रश्न केला.

" ते सज्जनगडाहून परत येत होते. तेथील कांही तरी असेल."

" अरे, होय! आपल्या 'जिजाबाई पथका'च्या मुली सज्जनगडावर स्वयंसेविकांचें काम करण्यास गेल्या होत्या. त्या आता येणार आहेत."

" ही घ्या नोटीस;" शांताबाई वाचूं लागल्या. " पांचव्या इयत्तेंतील विद्यार्थिनी कु. राणी गोरे हिचें सज्जनगडास केलेल्या कामगिरीबद्दल अभिनंदन करण्यासाठी 'जिजाबाई पथका'ने सभा बोलाविली आहे."

" छान! छान!" ढोबळेमास्तर म्हणाले, " काम करण्यास गेल्या पथकाच्या मुली आणि कामगिरी केली रातराणीने."

" तरीच. मी आपला विचार करीत होतों की, 'जिजाबाई पथकां'तील कोणत्या मुलीने हें काम केलें असेल! पण ही रातराणी इतकें करूं शकेल असें नव्हतें बुवा. कधी वाटलें," रा. ढोबळे म्हणाले.

" अहो, ती रातराणीना! जवळून कळायची नाही. दुरूनच तिच्या अस्तित्वाची जाणीव व्हावयाची."

शिक्षक व विद्यार्थिनी सर्व मोठ्या उत्साहाने हजर होत्या सभेला. शेवटी उत्तर देण्यासाठी रातराणी उभी राहिली. आभार मानून ती म्हणाली, " मी सांगूं का? मूल उचलून आणीपर्यंत मलाहि कल्पना आली नाही त्यांत काय धाडस होतें त्याची! गडावरील मुख्य सभामंडपांत कथा चालू होती; मावशी व आम्ही दूर उभारलेल्या एका झोपडीच्या अंगणांत बसून ती कथा ऐकत होतों. आई स्वतःच्या जिवाकडे न पाहतां मुलाचें संरक्षण करते अशी गोष्ट हरिदासबुवा सांगत होते; त्यावरून मला माझ्या आजीची आठवण झाली. मावशी सांगे, 'अंगणांत चुलाणावर पाण्याचें तपेलें तापत होतें. मी दोन वर्षांची होतें. मी तेथे जाऊन, लाकडावर पाय देऊन कढत पाणी काढूं लागलें. माझे पाय भाजतील ह्या भीतीने आजी धावत आली व तिने माझे हात सोडविले. पण त्या गडबडींत आधणाचें पाणी तिच्या पायांवर सांडून, तिचे पाय भाजले व दोन महिन्यांचें दुखणें झालें.' हे विचार माझ्या मनांत येतात तोंच पाठीमागे ओरडा झाला कीं, पाळणा पेटला, आंत मुलगी तान्ही आहे. एकदम मला वाटलें, 'तेव्हां माझ्या आजीने धावपळ केली नसती तर मी तरी कशाला आज ह्या कथेला आलें असतें!' व या विचाराने मी धावलें झालें.

मुलगी आईच्या स्वाधीन केल्यावर मला कळलें की, डावा हात थोडा भाजला आहे व केसांच्या बटा होरपळल्या आहेत."

स्वानुभूतीच्या आधारावर भाषण झालें, त्यामुळे अर्थातच तें परिणामकारक वठलें.

"या अमावास्येच्या ठिकाणीं इतकें धाडस असेल, अगर ही बावळी मुलगी इतकें छान भाषण करील अशीहि आपल्याला कल्पना नव्हती," रा. ढोबळे म्हणाले.

आम्ही आपले समजतों की,

"काळोखाची राणी होती
हृदयीं भरल्या असती खंती"

रा. कोटिभास्कर म्हणाले.

"अहो म्हणून तर--

"अंधारांताचि लपतें सारें
चित्त न लक्षी हृदिंचे तारे"

शांताबाईंनी समस्यापूर्ति केली.



## चिमणी : : : १३

"Chimbai! Chimbai! Open door!"
"Chimbai! Chimbai! Open door!"

हे शब्द सुरावर म्हणत चौथ्या इयत्तेंतील चार-पांच मुलींनी दारावर धक्के मारण्याचा ठेका धरला होता.

"Wait, O Dead! Let children be fed
And then I'll open door."

आंतल्या बाजूने दारावर प्रत्युत्तरात्मक ठेका धरून लकेर घेतलेली ऐकूं येत होती. इतक्यांत सौ. तुळपुळेबाई घाईघाईने आल्या व दार उघडूं लागल्या. पण दार उघडेना.

“ हा काय दंगा ! आणि दार आंतून कोणीं बंद केलं आहे ? ” त्या रागावून म्हणाल्या. “ –आणि धक्के मारून दार काय फोडायचं आहे ? ”

तुळपुळेबाईंना पाहिल्याबरोबर बाहेरच्या मुली चपापून मागे सरल्या व गप्प बसल्या. पण आंतल्या चिमणीला त्याची काय कल्पना ? दाराकडे पाठ करून खिशांतले काजूगर तोंडांत कोंबण्यांत ती गुंतली होती. तोंड वळवून दार उघडते तों बाई एकदम आंत शिरल्या.

“ शाबास चिमणे ! तूंच का ही. आता मॅट्रिकला जाणारीच मुलगी असं करायला लागल्यावर त्या चौथीच्या मुलींना काय बोलायचं ! ”

तुळपुळेबाईंनी कपाट उघडून त्यांना काढावयाचीं तीं पुस्तकें काढलीं. चिमणी आता चोरासारखी मुकाट्याने उभी होती. इतक्यांत त्यांना आठवण होऊन त्या म्हणाल्या, “ गोरेबाईंनी तुला बोर्डिंगांतून शोधून आणायला गडी धाडला आहे आणि तूं तर इथेच. आज प्रिलिमिनरी होतीना ! नांव-नंबर सगळं नीट होतं ? ”

‘अय्या’ चिमणी ओरडून म्हणाली, “ बाई, विसरलें वाटतं.” आणि हातांतील काजूची मूठ मैत्रिणींच्या हातावर टाकून ती परीक्षेच्या हॉलकडे पळत गेली.

आणि हा दंगा नेहमीचाच होता तिचा. होती ती सातवींत आणि आता प्रिलिमिनरी झालेली. दोन महिन्यांनी कॉलेजकन्यका व्हावयाची. पण तिची वृत्ति ही अशी. तिच्या साऱ्या मैत्रिणी चौथींतल्या होत्या. सातवीची परीक्षा जवळ आली. अभ्यास केला पाहिजे असें–इतर मुली अभ्यास करीत म्हणून–तिला वाटे. शांतपणें अभ्यास व्हावा, म्हणून ती इमारतीच्या अगदी कडेच्या म्हणजे चौथीच्या वर्गांत येऊन, दारें बंद करून बसे; व वाचतांना करमणूक म्हणून काजू, शेंगदाणे इत्यादि कांही कांही चिमणचारा खिशांत भरून आणी. तिच्या मैत्रिणींना लवकरच याचा सुगावा लागला. त्या दाराबाहेर उभ्या राहून, तिला हाका मारीत ‘चिमणे, चिमणे, दार उघड.’

तिच्या काकांनी तिच्या चिमणी नांवावरून एक गाणें रचलेलें तिला आठवत होतें व तें तिने मुलींना सांगितलें होतें. कावळ्या-चिमणीची गोष्ट होती ती. कावळा म्हणे, “ चिमबाई, चिमबाई दार उघड.” चिमणी म्हणे, थांब मेल्या ! मी आधी आपल्या मुलांना जेवायला घालतें व मग दार उघडीन.”

“ Chimbai ! Chimbai ! Open door !
Chimbai ! Chimbai ! open door !

Wait, O Dead! Let Children be fed
And then I'll open door."

दारावर धक्के मारीत प्रश्नोत्तररूपाने या ओळी हेल काढून म्हटल्या जातां जातां त्याला एक चाल लागली व पटदीप रागामध्ये God save the King म्हणावें त्याप्रमाणें 'आनंदाचा कंद हरि हा' या चालीवर तें गायिलें जाऊं लागलें. मुली दारावर धक्के देऊं लागल्या, म्हणजे चिमणी Wait, O Dead! Let children be fed" असें म्हणून आपल्याच तोंडांत काजूचा बोकाणा भरी व मग दार उघडी. एकदा माल 'wait o dead!' असें गात गात मैत्रिणी आल्या आहेत असें समजून, वेडीवाकडीं तोंडें करीत तिने दार उघडलें व पाहिलें तों दारांत गोखलेमास्तर; तेव्हा माल तिची फार धांदल उडाली. तेव्हापासून असें दार लावून बसावयाचें तिने सोडून दिलें, असें नव्हे, तर आधी कोण आलें आहे हें पाहिल्याखेरीज दार उघडण्याचें सोडून दिलें.

चिमणी म्हणजे एक हसरी-नाचरी परी होती. तिच्या जगांत अजून हास्याखेरीज रस व आनंदाखेरीज वेगळी स्थितीच निर्माण झाली नव्हती. आणि व्हावी कशी?

मनांत येण्यापूर्वीच प्रत्येक गोष्ट मिळूं लागली तर विचार करायचा केव्हा? बरोबरीचें घरांत कोणीच नाही, सर्वच मोठीं व कौतुक करणारीं. तेव्हां तुलनेने उत्पन्न होणारी शहाण्या-वेड्याची व चढाओढीची कल्पना यावी कशी? पानावर पडलेलें मोगरीचें फूल प्रवाहांत वाहत वाहत नदीच्या मुखाशीं आलें, तरी भोवतालच्या काटक्या, कचरा, फेस यांनी अस्पर्शित व लाटांनी न हेलावलेलें अतएव टवटवीत व स्वच्छ दिसावें तशी तिच्या जीवनाची स्थिति होती. जीवनप्रवाह शाळेच्या छोट्या जगांतून कॉलेजच्या विस्तीर्ण जगांत पसरण्याची वेळ आली तरी तिला अजून आपण आईच्या मांडीवर लोळत आहोंत असेंच वाटे. इतक्या सहज व निश्चिंतपणें ती जगांत वावरे. वडिलांनी लवकर दूर पाठवावयास नको, म्हणून तिला शाळेंत न पाठवतां सर्व शिक्षण स्वतःच घरीं करून घेतलें, व ग्रहणशक्ति बरी म्हणून तिच्या पठित पुस्तकांची संख्या वाढत वाढत इंग्लिश चौथीपर्यंत गेली. पांचवींत शाळेंत आली तीहि एक सदरा घालून व गळ्यांत पुस्तकांची पिशवी अडकवून लहान मुलासारखी.

शाळेंत मात्र तिची स्थिति 'झोपी गेलेला जागा केला' अशी झाली. पन्नास वर्षांनी जागा झालेला मनुष्य जसा मागील पन्नास वर्षांतील घटना उत्सुकतेनें पाहील त्याप्रमाणे पुढल्या इयत्तांपेक्षा मागील चार इयत्तांतील आयुष्यक्रमाकडेच ती जास्त उत्सुकतेने पाही व खालच्या इयत्तांच्या मुलींतच जास्त समरस होई. तिच्या आवडीनिवडी तिसरी चौथीच्या मुलींशीं जास्त जुळत. शाळेच्या तासांखेरीज बाकीचा सर्व वेळ तिचा त्या मुलींत जाई. मधल्या सुटींत व्हरांड्यांतील कठड्याला टेकून गप्पा मारण्यांत सातवीच्या मुली रंगून जात. अमुक मास्तरांचा तास आज चांगला कां झाला नाहीं, त्यांनी रुमालाचा रंग कां बदलला, अमुक बाईंनी अबोलीची वेणी घालण्याचें सोडून मोगरीचीं दोन फुलेंच डोक्यांत घालण्यास कां सुरुवात केली असावी, वर्गांत मार्क देतांना पक्षपात कसा होतो, इत्यादि कुचकुच तेथे हटकून ऐकूं यावयाची. पण या कुचकुचीपेक्षा चौथीच्या मुलींची चिंव-चिंव तिला मानवे. 'चिंव चिंव चिमणी छतांत' हें गाणें गात तिसरीच्या मुली आपल्या वर्गांत नाचत, त्यांत जाऊन ती मिसळे. वर्गांत पेपर चांगला लिहिला म्हणून मास्तरांनी स्तुति केली अगर चेष्टा करून पेपरांतील कांही वाक्यें वाचून दाखविलीं तरी ती सारखीच मोकळया मनाने हसे.

क्षमा मागावयाला जाण्यांतहि तिला कमीपणा वाटत नसे. त्यांच्या वर्गांत एकदा एक विनोदगर्भ करुण घटना घडून आली. निबंधाच्या वह्या तपासून झाल्या होत्या, व गोखलेमास्तर चुका समजावून देत त्या परत देत होते. गोदूबाईची वही उघडून ते स्पष्टीकरण देत वर्गांत हिंडूं लागले व चिमणीच्या डेस्कपाशीं पोंचले. पान उघडतांच व्याकरण हा शब्द 'व्याक्रण' लिहिलेला पाहतांच संताप येऊन, " 'व्याकरण' शब्द शुद्ध लिहितां येत नाहीं. कशा आलां सातवीपर्यंत?" म्हणून समोर बसलेल्या चिमणीवर त्यांनीं प्रश्नांचा भडिमार केला. चिमणी बिचारी उठून उभी राहिली.

"किती मार्क मिळाले होते वार्षिक परीक्षेंत?"

"पन्नास."

"कोणीं दिले?"

"सर, तुम्हीच!"

सर्वच वर्ग हसूं लागला व सर रागावून वर्ग सोडून निघून गेले.

साडेदहा वाजता सातवीच्या सर्व मुली वर्गात जमून मोठे बेत चालले होते.

" चिमणे, हें सगळं तूं केलेंस." एकजण म्हणाली. " तूं हो आता पुढे क्षमा मागायला " दुसरी.

" मी काय खोटं बोललें ग! त्यांनीच नाही का मागच्या वर्षी पन्नास मार्क माझ्यां पेपरला दिले?" चिमणी म्हणत होती, " मागच्या वेळी उत्तर दिलें नाही म्हणून रागावले होते; म्हणून या वेळी मीं उत्तर दिलें."

" अग! पण हा प्रश्न उत्तरासाठी नव्हता." एक व्यवहारचतुर.

" मास्तर रागावून असं विसंगत बोलूं लागले ना म्हणजे त्यांच्या प्रत्येक वाक्याचा अन्वय-अर्थ करावयाचा नसतो. " रागावले आहेत झालं!" इतकाच गोळाबेरीज अर्थ करून गप्प बसायचें हो!"

" मला नाही बाई हें कळत तुमचं!" चिमणी गाल फुगवून म्हणाली, आता करायचं काय तें सांगा."

" पण गोदूचा पेपर हातांत घेऊन चिमणीवर रागावले यांत तिचा काय दोष आहे ग?" तिसरी.

" आणि हा विसरभोळेपणा पाहून मुली हसल्या, तर त्यात काय ग, येवढं चुकलं?"

" पण कविसंकेत आहेना! चुकतं तें मुलींचं!–" एका शिष्ट मुलीने उद्गार काढले.

" जायचं झालं क्षमा मागायला! पण प्रकृतिवक्रः स कस्यानुनयं प्रतिगृह्णाति, ग!" एक स्कॉलर. आणि चिमणीला पुढे करून सर्व वर्ग क्षमा मागावयास गेला. आपण जरा जास्तच रागावलों असें मनांत वाटल्यामुळे असो की चिमणीच्या प्रांजल व हसतमुखाने केलेल्या खुलाशाने असो, मास्तरांचा राग गेला व सर्व सुरळीत चालू झालें. तेव्हापासून कोठेहि कोणाकडेहि जाऊन स्पष्टीकरणाचा प्रसंग आला की, मुली चिमणीला पुढे ढकलतात. आणि हे प्रसंग बहुतेक आठपंधरा दिवशी येतात. दुर्गाताई मुळी चिमणीला विचारतातच, " चिमणे, या आठवड्यांत अजून कुणाकुणाची क्षमा मागावयाची उरली आहे?"